पुणें विद्यापीठ



बहि:शाल शिक्षण मंडळ

बहि:शाल शिक्षण ग्रंथमाला

संपादक
डॉ. अ. वि. नाईक, एम्.ए., पीएच्.डी.
सचिव, बहि:शाल शिक्षण मंडळ,
गणेशखिंड, पुणें ७

४

# भारतीय पशू

लेखिका

सौ. शकुंतलाबाई पोंक्षे, साहित्यप्राज्ञ
कोल्हापुर

१९५५ ]

[ मूल्य अडीच रुपये

मुद्रक
श्री. द. कृ. काकनूरकर
प्रकाश मुद्रणालय,
३९५/४ सदाशिव पेठ,
पुणें २.



प्रकाशक
डॉ. अ. वि. नाईक
सचिव, बहि:शाल शिक्षण मंडळ,
पुणें विद्यापीठ,
गणेशखिंड, पुणें ७.



## ऋणोल्लेख

ग्रंथलेखिकेचे 'सृष्टिज्ञान' मध्यें पूर्वीच प्रसिद्ध झालेले लेख आणि आकृत्या यांचा या ग्रंथांत समावेश करण्यास संमति देऊन पुष्कळ आकृत्यांचे ठसेहि वापरण्यास दिले याबद्दल 'सृष्टिज्ञान' चे संपादक आणि आर्यभूषण छापखान्याचे व्यवस्थापक यांचें बहि:शाल शिक्षण मंडळ ऋणी आहे.

# प्रकाशक-निवेदन

मुंबई सरकारच्या सन १९४८ च्या पुणें विद्यापीठ कायद्यांतील २६ व्या कलमान्वयें पुणें विद्यापीठानें १९५० सालीं **बहि:शाल शिक्षण मंडळ** स्थापन केलें. मंडळाच्या उद्देशांपैकीं सामान्य जनतेला उपयुक्त असणाऱ्या व आकलन होणाऱ्या विषयांवर पुस्तकें लिहून घेण्याची व प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करणें हा एक आहे.

तदनुसार **'भारतीय पशू'** हे पुस्तक **सौ. शकुंतलाबाई पोंक्षे** यांजकडून मंडळानें तयार करून घेतलें आहे व तें आतां **बहि:शाल शिक्षण ग्रंथमालेंतील ४ थें पुष्प** म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

पुणें विद्यापीठ,
गणेशखिंड, पुणें ७
चैत्र शु० १, शक १८७७
२४-३-१९५५

**अ. वि. नाईक**
सचिव,
बहि:शाल शिक्षण मंडळ.

# लेखिकेची प्रस्तावना

आपल्या मराठी भाषेंत सृष्टिवर्णनात्मक वाङ्मय फारच थोडें आहे. पशुपक्ष्यांचें त्रोटक वर्णन ज्यांत आहे असें एक पुस्तक श्री. विष्णुपंत गोखले यांनीं लिहिलेलें मीं वाचले आहे. पण तें आज बाजारांत मिळत नाही. यापुढें आपल्याला सर्वच शिक्षण मराठीतून द्यावयाचें आहे. त्याकरतां पाठ्य-पुस्तकें आणि संदर्भग्रंथ पाहिजे आहेत. प्रस्तुत पुस्तक छोटासा संदर्भग्रंथ म्हणून उपयोगी पडावें अशी अपेक्षा आहे. यांत जी माहिती दिली आहे ती परिपूर्ण नाहीं, तरी शाळेच्या पाठ्य-पुस्तकांतून येणाऱ्या माहितीपेक्षां अधिक आहे. ती शास्त्रीय पद्धतीनें दिलेली आहे म्हणून प्रौढ शास्त्र शिकणारास उपयोगी पडण्याजोगी आहे.

जीवशास्त्र शिकणारानें जीवजातींचे परस्परसंबंध लक्षांत आणणें अगत्याचें असतें. म्हणून जातींचीं नावें सुद्धां ते संबंध दर्शविणारीं असावीं लागतात. याकरतां जातिनामाला गोत्रनाम जोडून घेण्याची पद्धत आहे. तथापि आज मराठींत जातिनामेंच पाहिजेत तितकीं नाहींत. येथें ज्या थोड्याशा जाती वर्णिल्या आहेत तेवढ्यांसहि तीं पुरेशी नाहींत. कांहीं नांवें संदिग्ध आहेत. जीं संदिग्ध आहेत तीं पूर्वानुबंध तपासून निश्चित करून घेतलीं आहेत आणि जेथे मुळीं नाहींतच तेथें तीं जवळच्या संबंधांतल्या जातिनामावरून थोडासा फरक करून तयार केलीं आहेत. हरिण आणि कृंतक यांच्या जाती याविषयीं उदाहरण म्हणून सांगण्यासारख्या आहेत.

येथें दिलेली माहिती आणि त्यासोबतच्या आकृती बहुशः प्रेटरकृत Indian Animals या पुस्तकावरून घेतल्या आहेत. हें पुस्तक मुंबईच्या Natural History Society या संस्थेनें प्रकाशित केलेलें आहे. याच संस्थेनें मुंबईच्या म्युझियम (मननघर) मध्यें निर्जीव प्राण्यांचें प्रदर्शन मांडलेलें आहे. त्यांत या माझ्या पुस्तकांत वर्णिलेले पुष्कळसे पशू पहावयास मिळतात. पुष्कळसे जिवंत पशू मुंबईतील राणीच्या बागेंतहि पहावयास मिळतात. मोकाट पशू पाहाण्याची संधि फक्त शिकारी लोकांसच येणार.

या पुस्तकांतील अकरा प्रकरणांपैकीं दहा सृष्टिज्ञान मासिकांत १९५०-५१ मध्यें प्रसिद्ध झालेलीं आहेत. पृष्ठसंख्येची मर्यादा संभाळण्याकरतां त्यांतील संस्कृत अवतरणें येथें गाळून टाकलीं आहेत. पुणें विद्यापीठ बहिःशाल शिक्षण मंडळाच्या विनंतीवरून प्रा. ज. नी. कर्वे यांनीं तीं तपासून पाहून जी भर घालावयास सांगितली ती पहिल्या प्रकरणाच्या रूपानें घातली आहे. मूळ लेखनाची प्रेरणा माझे वडील तीर्थरूप डॉ. मल्हार विनायक आपटे यांनीं दिली असल्यामुळें या उद्योगाचें मुख्य श्रेय त्यांजकडेच आहे.

— शकुंतला पोंक्षे

# — अ नु क्र म णि का —





# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | |
|---|---|---|
| ३८ | १७ | ............................. दोन पायांव |
| ७४ | ३ | संहार अधिक झाला. त्याला कारण ........... |
| ७७ | २१ | ............................. एवढे मोठेच सुठे |
| ९४ | १० | फळें खाणारीं आहेत पण दुसरी कीटक खाणारी जाति |





आ. ७ ] चितळ सारंग [ पृ. १०

# भारतीय पशू



## प्रकरण पहिलें

## पशुसृष्टि

आपल्या देशाच्या संपत्तीचा एक महत्त्वाचा भाग पशू या स्वरूपाचा आहे. गाय, घोडा, कुत्रें, मांजर हे मनुष्यवस्तींत राहणारे पशू होत. गाई आणि घोडे आपण पाळलेले असतात. कांहीं कुत्रीं आणि मांजरेंहि तशींच असतात. तथापि तीं पुष्कळशी मोकाटहि असतात. पुष्कळसे पशू मनुष्यवस्तीपासून दूरवर रानावनांत राहतात. त्यांपैकीं कांहीं आपल्या शेतीला उपद्रव करतात. हरणे, ससे, उंदीर, घुशी हे असे उपद्रवी पशू होत. यांशिवाय कोल्हे, कुत्रे, वाघ, सिंह असे आणखी कांहीं पशू आहेत. ते हरिणादि उपद्रवी पशूंचा संहार करणारे आहेत. शेतीचा सांभाळ करण्याच्या दृष्टीनें या सर्व पशूंच्या स्वभावाविषयीं माहिती असणें अवश्य आहे. अशा ज्ञानाचा आणखी एक उपयोग आहे तो सृष्टीविषयीं यथार्थ कल्पना येणें हा होय.

स्थावर आणि जंगम असे जीवसृष्टीचे भाग सहजच लक्ष्यांत येतात. त्यांपैकीं जंगमांत पशूंचा समावेश होतो. स्थूलमानानें पाहिलें तरी शंभर जातींचे पशू भारतांत सहज आढळतात. या शंभर जातींचे असे दहा गट पडतात कीं एकेका गटांत साधारणतः दहा जाती असून त्या एकमेकींपासून फारशा भिन्न नाहींत, परंतु इतर गटांतल्या जातींपासून पुष्कळ भिन्न आहेत. एका गटांत माकड आणि कपि हे पशू असे आहेत कीं त्यांचें माणसाशीं साम्य बरेंच आहे. इतरांपैकीं उंदीरबिंदीर या गटांतल्या जातीचें माणसाशीं

थोडेंसें साम्य आहे; पण राहिलेल्या आठहि गटांतल्या पशुजाती माणसाहून फारच भिन्न आहेत. उंदराचा आहार, त्याच्या पचनेंद्रियांची ठेवण आणि कार्यपद्धति, या गोष्टी पुष्कळ अंशीं माणसाच्यासारख्या आहेत. हरिणादिकांचा आहार आणि तो पचवण्याची रीत माणसाच्यापेक्षां पुष्कळ वेगळी आहे. हिंस्र पंशूंची गोष्टहि तशीच आहे. ते माणसाहून फार भिन्न स्वभावाचे आहेत.

पशुपशूंमधील भेद लहानमोठे असले तरी त्यांमध्यें कांहीं गोष्टी सामान्यहि आहेत. त्या अशा. सर्व पशूंच्या त्वचेवर केस उगवतात. सर्वांना चार पाय असतात आणि सर्वांचें पोषण बाळपणीं मातेच्या दुधानें होतें. या तीन गोष्टींपैकीं शेवटची गोष्ट विशेष महत्त्वाची आहे. अपत्याला लहानाचें मोठें करण्याचा तो उत्तम उपाय आहे. पक्षी आपलीं अपत्यें आपण वाढवतात, पण त्यांना दूध येत नाहीं. ते आपल्या अपत्यांना वेंचलेलें अन्नच भरवतात. आतां वाघुळ हा एक असा पक्षवन्त प्राणी आहे कीं त्याच्या मादीला दूध येतें. त्याला केसहि असतात. शिवाय त्याला चार पायहि असतात. म्हणून त्याची गणना शास्त्रीय दृष्ट्या पशूमध्येंच करावयास पाहिजे. वाघूळ हा पक्षवन्त पशु आहे.

देवमासा हा एक जलचर सर्वांना ऐकून तरी माहीत असेल. त्याला आपण मासा म्हणतों. पण इतर मत्स्यांप्रमाणें त्याची मादी कांहीं अंडीं घालीत नाहीं. त्यांचीं पिलेंच जन्माला येतात. ती मातेचें दूध पिऊन वाढतात. त्यांना पर असतात. त्यांतील सांगाडा हातांपायांच्या धरतीचा असतो. म्हणून हा जलचर बनलेला पशु आहे असें म्हणावें लागतें. पशुसृष्टीचे लागेबांधे जलचर आणि वायुचर सृष्टीतहि कसे गेलेले आहेत, तें या दोन उदाहरणांवरून दिसून येतें.

वाघ, सिंह इत्यादि पशू हिंस्र आहेत. ते हरिणादिकांस मारून खातात. हरिणादि पशू झाडेंझुडें भक्षण करतात. कीटकांची संख्या पशुपक्ष्यांपेक्षां

फार मोठी आहे. पुष्कळशा पक्षिजाती किडे खाणाऱ्या आहेत. पुष्कळशा कीटकजाती पशूंना उपद्रव करणाऱ्या आहेत. या उपद्रवी कीटकांना खाणारे पक्षी आहेत. गाई-म्हशींच्या अंगावर गोचिड्या वावरतात. त्या खाण्याकरतां साळुंक्या आणि बगळे त्यांच्याभोंवतीं संचार करतात असें दृश्य वारंवार दृष्टीस पडतें. पुष्कळसे किडे झाडपाला, झाडाची माल किंवा लाकूड खाऊन वाढतात. पुष्कळशा पशूंचें अन्नहि तेंच असतें. म्हणून अशा पशूवर कीडखाऊ पक्ष्यांचे मोठेच उपकार आहेत म्हणावयाचे. पशूंमध्येंहि कीडखाऊ पशू आहेत. पशू, पक्षी, कीटक आणि झाडेंझुडेंसुद्धां एकमेकांवर कशीं अवलंबून आहेत तें यावरून कळून येतें.

आज जे पशू पृथ्वीच्या पाठीवर वावरत आहेत त्यांच्याविषयीं हा विचार झाला. पृथ्वीच्या पोटांत गडप झालेलीं पशूंचीं हाडें सांपडलीं आहेत. तीं तपासून पाहतां असें आढळून येतें कीं, आज आहेत त्यांहून अमळ वेगळ्या बांध्याचे पशू गतकाली या पृथ्वीवर होते. हीं हाडें ज्या थरांत सांपडतात तो किती जुना असावा यासंबंधीं शास्त्रज्ञांनी तर्क बांधलेले आहेत. त्यावरून कांहीं पशुजाती कांहीं काळापूर्वीं होत्या त्या आज नाहींत असें कळून येतें. कालाच्या ओघांत पशुसृष्टींत काय काय फरक होत आलेला आहे याविषयीं किंचित् कल्पना यावरून येऊं शकते.

पृथ्वीचें वय अब्ज वर्षांनी मोजण्याइतकें मोठें आहे. अलीकडल्या दहा पांच लाख वर्षांपूर्वीं पृथ्वीवर माणूस नव्हता, आणि चार कोट वर्षांपूर्वीं पशुपक्षीहि नव्हते, असें शास्त्रीय अनुमान आहे. पशुसृष्टीविषयी कांहीं थोडे सामान्य विचार येथें सांगितले. आतां पुढील प्रकरणांत एक एक गटाचा विशेष विचार थोड्याबहुत विस्तारानें करूं या.

## प्रकरण दुसरें

# मृग आणि मृगया

मृगया हा माणसाचा पहिला उद्योग असला पाहिजे यांत संशय नाहीं. माणूस फलाहारी आहे, धान्याहारी आहे, आणि मांसाहारीहि आहे. प्रथम आहार फलांचा, मग धान्यांचा असा क्रम दिसतो कारण धान्य मिळविण्याकरतां शेतीची आवश्यकता असते तशी फळांकरतां नसते. शेती करण्याकरतां हत्यारें लागतात. जनावरांपासून शेताचें संरक्षण करावें लागतें. त्याकरतां हत्यारें लागतात. त्याच हत्यारांनीं मृगया करतां येते; नव्हे करावी लागते. **मृग्** म्हणजे **शोधणें**. उपद्रव देणारीं जनावरें शोधून काढून मारावी लागतात. तीं मारल्यानंतर त्यांचें मांस खाणें सहजच सुचतें. शेतीला त्रास देणारीं जनावरें मुख्यतः गाई, बकरीं, मेंढी, हरिण हीं **मृग्य** होत. यांनाच **मृग** म्हणतात. यांपैकीं गाई आणि बकरीं प्रथम यज्ञार्थ उपयोगीं पडलीं. माणसाळल्यानंतर तीं दुभतीं झालीं. त्यांपैकीं गाई विशेष दुधाळ असल्यानें विशेष रक्षणीय ठरल्या. सुसंस्कृत मानवी राज्यें स्थापन झालीं तेव्हां मृगया हा क्षत्रियांचा सामान्य उद्योग आणि राजांचा विशेष अभ्यासविषय झाला. राजाच्या मृगयेकरतां **मृगवनें** राखून ठेवण्यांत येऊं लागलीं. त्यांत हिंस्र पशूहि असत.

### कुरंग-हरिण ( Antelope )

हरिण म्हटलें म्हणजे मोठे काळे डोळे, चंचल दृष्टि, बारीक चपल पाय, इ० गुणांची एक सुंदर मूर्ति आपल्या डोळ्यांसमोर उभी राहते. बहुतेक हरिणांच्या माद्यांना शिंगें नसतात; नरांना असतात. त्यांचीं तोंडें गाईच्या वासरासारखीं असतात; पण शेपूट शेळीसारखी असते. सृष्टिक्रमांत गाय आणि शेळी या दोहींपेक्षां हरिणांपैकीं कुरंग जुनें आहे. तेव्हां त्यापासून गाई आणि शेळ्या उत्पन्न झाल्या, असा तर्क आहे. याला दुहेरी साम्याचा दुजोरा मिळतो. गाईचीं शिंगें आणि हरणांचीं शिंगें यांत कांहीं साम्य

आणि कांहीं वैषम्यहि आहे. गाईच्या शिंगांच्या आंत भोकाळ हाड असतें आणि त्यावर त्वचेंतून उगवलेलें कवच असतें. कुरंग-हरिणांच्या शिंगांनाहि त्वचेंतून उगवलेलें कवच असतें आणि त्याच्या आंत हाड असतें, पण तें हाड बहुशः भरीव असतें, भोकाळ नसतें. कुरंग-हरिणाच्या **डोळ्यांखालीं एक ग्रंथी** असते, हा त्यांचा एक विशेष आहे. बाहेरून या ग्रंथींच्या जागीं एक काळी भेग दिसते. भेगेच्या शेवटीं एक खोल खळगा असतो. त्यांत या ग्रंथींतून स्रवणारा स्राव सांठतो. या स्रावाच्या वासानें कुरंग-हरिण एकमेकांला ओळखतात.

अति सुंदर असल्यामुळें कुरंग-हरिणांचा संहार अतिशय होत आला आहे. त्यांचें कातडें, त्यांचें मांस, त्यांचे मुखवटे, सर्व कांहीं माणसाला प्रिय आहे. हिंस्र पशू त्यांच्यावर नित्य टपलेले असतात. त्यांच्या तावडीतून निसटण्याकरता पलायनाखेरीज हरिणांना दुसरा उपाय नसतो. शत्रूची चाहूल ओळखण्याकरतां त्यांचे कान टवकारलेले असतात. पण कानांपेक्षां त्यांना त्यांच्या डोळ्यांचा उपयोग अधिक होतो. कुरंग-हरिण मैदानावर राहणारा प्राणी आहे. म्हणून त्याला दूरवर दृष्टि चालवण्यास सवड असते. शत्रु कोठें दृष्टीस पडतो कीं काय म्हणून त्यांचे **डोळे** चहूंकडे शोध करीत असतात. ते **विस्तृत** आणि **चंचल** असतात. हरिणनेत्र हें विस्तार आणि चंचलपणा या दोन गुणांचें केवळ उपमान होऊन बसलें आहे.

कुरंग-हरिणांचा कळप बसतो तेव्हां ढुंगणें जवळ जवळ आणि तोंडें दाही दिशांस, अशा रीतीनें बसतो. कुरंग-हरिण माणसाळतात म्हणजे माणसानें त्यांना त्रास दिला नाही तर तीं त्याच्याजवळ विश्वासानें राहतात; पण त्यांच्यांत वेगळे गुण उत्पन्न होऊन वेगळा प्रकार निर्माण झालेला नाहीं. वन्य कुरंग-हरिण आणि पाळीव कुरंग-हरिण यांच्या रूपांत व स्वभावांत भेद नसतो.

## १ एण (Indian Antelope). आ. १

कुरंग-हरिणांची ही प्रमुख जात आहे. यांतील नराला **कृष्णसार** काळवीट (Black buck) म्हणतात. त्याचा रंग पाठीवर काळा किंवा दाट पिंगा असतो. पाडसांचा फिका असतो. तसाच माद्यांचाहि असतो. काळविटांच्या शिंगाला कंगोरे असतात आणि सुबक वळणेंहि असतात. त्यांची उंची (खांद्याशीं) ३२" असते. शिंगें १६" ते २०" लांब असून वजन ९० पौंड असतें. हरिणीना सहसा शिंगें येत नाहींत.

एण **उजाड प्रांतांत राहतात,** सहसा जंगलांत शिरत नाहींत आणि पर्वतावरहि चढत नाहीत, परंतु शेताभातांत घुसतात. त्यांचे २०, ३० जणांचे कळप असतात. कधीं कधीं शेंकडोंचेहि असतात. पुढारी बहुधा **प्रौढ हरिणी** असते. कळपांतील हरिणींचा पति एकच असतो. तो कधीं कधीं **पुढाकार** घेतो. पुढें असो की मागें असो, त्याचें लक्ष्य सर्व कळपावर असतें.

मलबार किनाऱ्याखेरीज इतर सर्व भारतांत एण आढळतात. गवत हेंच त्यांचें मुख्य भक्ष्य असतें.

## २ चिंकार (Indian Gazelle). आ. २

चिंकार ही एणांच्या खालोखाल विपुल आढळणारी कुरंग हरिण जाति आहे. ही हरणें पश्चिमोत्तर भारतांत विपुल आहेत. दक्षिणेस कृष्णा नदीच्या कांठापर्यंत थोडथोडीं आढळतात. हीं दिसण्यांत एणांच्या खालोखाल सुरेख असतात. परंतु एणांच्यापेक्षां अधिक चपळ असतात. त्यांचा रंग पाठीवर तांबूस असतो. मानेचें वरचें अंग आणि तोंड त्याच रंगाचीं असतात. दोनहि गालांवर दोन पांढऱ्या रेषा असतात. नराला कंगोरेदार शिंगें असतात. त्यांना शेवटीं थोडासा पुढच्या अंगास कल असतो. माद्यांनाहि शिंगें असतात; पण तीं साफ असतात. कांहीं माद्यांना नसतातहि. मोठ्या चिंकाराची उंची २६" आणि वजन ५० पौंड असतें. गवत व झाडपाला हें त्यांचें नित्य खाद्य असतें. **पाणी न मिळाल्यास हिरवळ आणि दव**

**यांवर ते कांहीं दिवस काढूं शकतात.** त्यांचे कळप लहान लहान असतात. ते भित्रे असल्यामुळें फार करून शेताभातांत शिरत नाहींत. शेजारच्या तुरळक झाडाझुडपांचा आसरा घेतात. दाट जंगलांतहि शिरत नाहींत. बिचकल्यावर एकदम पळूं लागतात, त्यामुळें भलत्याच दिशेला भडकून अचानक शत्रूच्या तावडींत पुष्कळ वेळां सांपडतात.

### ३ चौशिंग ( Four-horned Antelope ). आ. ३

या नांवाचें एक लहानसें कुरंग-हरिण असतें. त्याची उंची अवघी २५ असते. नरांना, दोन लहान दोन मोठीं अशीं, चार शिंगें असतात. शिंगांना कंगोरे नसतात. लहान शिंगें मोठ्यांच्या पुढें असतात. या कुरंगांना गंधग्रंथी असतात त्या त्यांच्या मागल्या पायांच्या आखूड ( आधांतरीं ) खुरांच्या मध्यें असतात. अशा ग्रंथी इतर कुरंगांना नसतात. रंग पाठीवर मध्यम पिंगट असून पायांच्या पुढच्या अंगास काळसर असतो. हिमालय आणि मलबार किनारा या ठिकाणीं हीं सांपडत नाहींत. इतरत्र साधारण विरळ झाडी आणि टेंकाडें यांच्या आसऱ्यानें राहतात. यांना वरचेवर पाणी पिण्यास पाहिजे असतें. त्याचप्रमाणें लपून राहण्याकरितां आणि खाण्याकरतां उंच गवत पाहिजे असतें. हीं कुरंगें कळप करीत नाहींत; जोडीजोडीनें राहतात. यांचीं पाडसें सहज माणसाळतात.

### ४ नीलगाय ( Blue Bull ). आ. ४

हें जनावर कांहींसें गाईसारखें कांहींसें कुरंगासारखें असें असतें. याचे खांदे मागल्या ढोपरापेक्षां उंच असतात. रंग राकट असतो. शिंगें कुरंगासारखीं असतात. पायहि कुरंगासारखेच असतात. नराच्या मानेखालीं लांब केसांचा एक पुंजका असतो. शेपटीला गोंडा असतो. नराची उंची ५६" पर्यंत असते. माद्या बऱ्याच लहान असतात. हीं कुरंगें हिमालयाच्या पायथ्यापासून म्हैसूरपर्यंत आढळतात. हीं विरळ जंगलांत राहतात. हीं गवत आणि झाडपालाहि खातात. यांना दिवस दोन दिवस पाण्यावांचून

राहतां येतें. साधेल तेव्हां तीं बरेंच पाणी पिऊन घेतात. असें एक कुरंग लोणावळें येथील तळ्यांतून निघणाऱ्या कालव्यांत पडलेलें एका सकाळीं आढळलें. त्याला सकाळींच वर काढलें. तें अतिशय दमलेलें होतें. सायंकाळपर्यंत तें झाडाखालीं बसून राहिलें आणि सूर्यास्ताबरोबर रानांत पळून गेलें.

यांचे लहान लहान कळप असतात. वृद्ध नर इतरांहून वेगळ्या कळपांत असतात. तरुण नर त्यांना माद्यांच्या सहवासांत राहूं देत नाहींत.

या कुरंग-हरिणाला **रोही** असें एक नांव आहे. हें आठ फूट उंच कुंपणावरून सहज उडी मारून जातें. या रोहणसामर्थ्यावरून हें नांव पडलें असावें.

## सारंग हरिण ( Deer )

सांबराचें शिंग सर्वांनीं पाहिलें असेल, निदान ऐकलें तरी असेल. त्याची गणना औषधांत होत असल्यामुळें तें घरोघरीं बाळगण्याची चाल पन्नास वर्षांपूर्वीं होती. हल्लीं शोभेकरतां सांबराचे मुखवटे बाळगण्याची चाल आहे. सांबरशिंग भरीव आणि शाखित असून केवळ हाडांचें बनलेलें असतें. गाईच्या किंवा कुरंग-हरणाच्या शिंगाचा गाभा हाडाचा असतो; पण त्याजवर त्वचेंतून उगवलेलें कवच असतें. **सांबरशिंग हें केवळ हाड** असतें. त्यावर कवच नसतें. सांबराच्या डोक्यावर शिंग वाढत असतांना त्यास त्वचावरण असतें. त्यांतून रक्तवाहिन्या वर गेलेल्या असतात. वाढ पुरी झाल्यावर त्या बंद होतात, त्वचा सुरकुतूं लागते, आणि ती पाडून टाकण्याकरतां सांबरें आपलीं शिंगें एखाद्या झाडावर घासतात. कालांतरानें सबंध शिंगेंच गळून पडतात आणि नवीं उगवतात. सांबरांची लढत होते तेव्हां त्यांना या शिंगांचा उपयोग होतो. केव्हां केव्हां शिंगें एकमेकांत अडकून मोठी आपत्ति ओढवते! **बारशिंग** आणि **चित्तल** या नांवांचीं हरिणें असतात. त्यांच्या शिंगांची घटना सांबराच्यासारखीच असते. अशा सर्व हरिणांना सारंग अशी संज्ञा आहे. आसामांतील सारंगांना **सांगराई**

असें नांव आज रूढ आहे.

सारंगाच्या डोळ्यांच्या नाकाजवळच्या कोपऱ्याखालीं एक मोठी भेग वरून दिसते. तिच्या अंतरंगांत एक **सुगंधस्रावी ग्रंथी** असते. कुरंगांनाहि सुगंधस्रावी ग्रंथी असतात, पण त्या डोळ्यांपासून थोड्या तरी अलग असतात; सारंगांच्या सलग असतात.

कुरंग रुक्ष प्रदेशांत राहतात, तर सारंग ओलसर गवताळ प्रदेशांत राहतात. थंडीच्या दिवसांत हवेपेक्षां तळ्याचें पाणी ऊबदार असतें तेव्हां सारंगांचे कळपच्या कळप तळ्यांत बसलेले आढळतात !

### ५ सांबर ( Sambar ) आ. ५

सर्व सारंगांत सांबर आकारानें मोठें असतें. उंची ५५", शिंगें २६" आणि वजन ५०० पौंड असतें. सांबरें सर्व प्रांतांत आढळतात. उत्तम सांबरें नर्मदा आणि तापी या नद्यांच्या कांठीं आहेत. सांबराचे केस हरिणाच्यापेक्षां भरड असतात. नरांना थोडेंसें आयाळ असतें. रंग पिवळस पिंगा असतो. माद्यांचा रंग फिका असतो. वृद्ध नराचा रंग काळसर होतो. शिंगांची वाढ चवथ्या वर्षीं पूर्ण होते.

गवत, झाडपाला आणि फळें हें त्यांचें खाद्य असतें. तीं दिवसा उघड्यावर हिंडत नाहींत, झाडींतून लपून राहतात. शत्रु हेरण्याकरितां दृष्टीपेक्षां वासावर त्यांची भिस्त अधिक असते. त्यांचीं शिंगे उन्हाळ्यांत झडून उगवूं लागतात तीं हिवाळ्यांत पूर्ण होतात.

कांहीं पक्षी हिंवाळ्यांत एका प्रदेशांत तर उन्हाळ्यांत दुसऱ्याच प्रदेशांत वसति करतात. तसेंच कांहींसें सांबरांचेंहि आहे. उन्हाळ्यापावसाळ्यांत ती इतरत्र हिंडतात पण हिवाळ्यांत एखाद्या दरींत उतरतात. प्रथमतः एखादा नर आपली जागा ठरवतो आणि तेथें दुसऱ्या नरास येऊं देत नाहीं. कोणी आलाच तर त्याशीं झगडतो. मग विजयी नरास राज्य मिळतें. तो तेथें येतील तेवढ्या माद्यांचें स्वागत करतो आणि त्यांशीं विवाह लावतो. अशा

एका कुटुंबांतील माद्यांची संख्या बाराच्या वर जात नाहीं. एक-दोन महिन्यांत सर्व माद्यांचें गर्भाधान झालें कीं नर त्यांना सोडून जातो. मग एखादी मादीच कळपाचा पुढाकार घेते. पाडसें होतात तीं प्रौढ होईपर्यंत आईपाशीं राहतात. तीं प्रौढ झाल्यावर त्यांतील नर वेगळे होतात, माद्या त्याच कळपांत राहतात. नराला मद आला म्हणजे त्याच्या अंगाला कांहीं विशेष वास येतो. त्याच्या योगानें माद्या त्याजकडे येतात.

६ **बारशिंग** (Swamp Deer). आ. ६

या नांवाचीं सारंगें पूर्वभारत, युक्तप्रांत आणि मध्यभारत या प्रदेशांत आढळतात. यांच्या शिंगांना १० ते २० फाटे असतात. म्हणून त्यांना बारशिंग म्हणतात. रंग आणि इतर ठेवण साधारण सांबरासारखीच असते. केस मात्र सांबरांपेक्षां मऊ असतात. पाडसांच्या अंगावर पांढरे ठिपके असतात ते प्रौढपणीं नाहींसे होतात. उंची ५४", शिंगें ३०" आणि वजन ४०० पौंड असतें.

हीं सारंगें युक्तप्रांतांत दलदलींत राहतात, मध्यभारतांत पाण्याच्या आसपास गवताळ रानांत राहतात. त्यांचे कळप फार मोठाले असतात, किंवा लहान लहान कळप शेजारीं शेजारी राहतात. मद आला म्हणजे नरांच्या झुंजी लागतात. अखेर एकेक नर साधारणपणें २०-२५ माद्या मिळवितो. मध्यभारत आणि युक्तप्रांत येथें यांचा मदकाल हिवाळा असतो, पूर्वभारतांत उन्हाळा असतो. मद संपल्यावर नर तुटक राहतात, किंवा इतर समबल नरांची संगत करून राहतात.

७ **चित्तल, चित्रांग, पृपत** (Spotted Dear). आ. ७

सारंगांपैकीं ही जात सहज ओळखतां येण्याजोगी आहे. त्याच्या अंगावर पांढरे ठिपके असतात. म्हणून त्यांना हीं नांवें पडलीं आहेत. सांबर आणि बारशिंग यांपेक्षां हीं बरींच लहान असतात. उंची ३६" आणि वजन १९० पौंड भरतें. उत्तम चित्रांग मध्यभारतांत आढळतात. या

जातीपासूनच सांबर आणि बारशिंग या जाती उत्पन्न झाल्या असाव्यात, असा शास्त्रज्ञांचा तर्क आहे. कारण या चित्रांगाच्याप्रमाणेंच बारशिंगाच्या अंगावर लहानपणीं ठिपके असतात. दाट रानांत राहणाऱ्या प्राण्याला लपून राहण्याला असें रूप विशेष उपयोगी असतें. हीच जात प्रथम दाट रानांत रहात असून त्यांतले कांहीं प्राणी उजाड रानांत राहूं लागले तेव्हां त्यांच्या अंगावरील ठिपके नाहींसे झाले, अशी उपपत्ति लागते. चित्रांग सारंगें मध्य-हिमालयाच्या पायथ्याशीं आणि तेथून दक्षिणेस लंकेपर्यंत आढळतात. तीं जलाशय आणि झाडी यांच्या आसऱ्यानें राहतात, परंतु चरण्याकरतां शेताभातांत घुसण्यास कमी करीत नाहींत.

चितळांचे लहानमोठे कळप असतात. कधीं दहा वीस तर कधीं शेंकडों चितळें एकत्र आढळतात. त्यांत अनेक नरहि असतात. मद आला म्हणजे मात्र नरांत मारामाऱ्या होऊन एक एक नर आणि त्याच्या दहा वीस भार्या असे कळप तयार होतात. चितळीला एकेका खेपेस दोन किंवा तीन सुद्धां पाडसें होतात. अशी संतति (वीण) वर्षांतून दोनदां देखील होते. विपुल संतति असली तरी त्यांची संख्या कांही वाढती नाहीं. कारण कित्येक चितळें हिंस्र पशूंच्या आहारीं पडतात, कित्येक सुसरींच्या आहारीं पडतात, आणि कित्येक माणसांच्याहि तडाख्यांत सांपडतात!

**८ नाभिमृग. कस्तूरीमृग** ( Musk Deer ). आ. ८

हिमालयाच्या उंचवट्यावर कस्तूरीमृग आहेत हें प्रसिद्ध आहे. हे मृग पाहिले तर धड कुरंगासारखे नाहींत आणि धड सारंगासारखेहि नाहींत. हे लहानशा बकरीसारखे दिसतात. यांना शिंगें नसतात, पण यांच्या वरच्या जबड्यांतले सुळे दांत वाढून खालीं डोकावतांना दिसतात. बकऱ्यांना असे दांत नसतात; कुरंगानाहि नसतात. सारंगांना असतात, पण ते बाहेर दिसत नाहींत. यांचे केस चडचडीत आणि लांबट असतात. ढुंगणावरचे केस इतके लांब असतात कीं त्यांत शेपूट सहज लपून राहतें. यांची उंची अवघी २०"

असते. कुरंगांच्या तोंडावर सुगंधग्रंथी असतात तशा यांच्या तोंडावर नसतात; पण नरांच्या पोटाखालीं बेंबीजवळ असतात. या ग्रंथींतून जो स्राव येतो तो मूत्रांत मिसळलेला असतो. वाळल्यानंतर मूत्राचा दुर्गंध नाहींसा होतो आणि केवळ कस्तूरीचा सुगंध राहतो. हे मृग एकेकटे किंवा प्रसंगीं जोडीजोडीनें राहतात. कस्तूरीच्या वासानें लोभावून मादी नराकडे जाते तेव्हां त्यांचा विवाह होतो.

या मृगांची वसति काश्मीर, नेपाळ आणि सिकीम या प्रदेशांत असते. हिमालयाच्या खालच्या भागांत ७०००' पर्यंत साधी झाडी आहे. त्यावरच्या प्रदेशांत देवदाराद्य गणांतली झाडी आहे. त्याच्याहीवर भूर्जवृक्ष आहेत. आणखी वर मोठी झाडी नाहीं, किरकोळ आहे. कस्तूरीमृग भूर्जवनांत किंवा त्याच्याहीवर असतात. ते जमिनींत खळगे करून लपून राहतात. गवत, दगडफूल, झाडपाला आणि फुले हें त्यांचें खाद्य असतें.

## उपसंहार

मृगांपैकीं कुरंग-हरिण आणि सारंग-हरिण या दोन गटांतील कांहीं जाती आपण पाहिल्या. कुरंगांपैकीं नीलगाय गाईच्याकडे झुकते. कस्तूरीमृग बकरीकडे झुकता आहे. त्याची गणना आधुनिक शास्त्रज्ञ सारंग-हरिणांत करतात. तो सारंगाच्या आद्य अवस्थेंत राहिला आहे. **सृष्टिक्रमांत गाय आणि बकरी या दोनहि जाती कुरंगापासून उत्पन्न झाल्या आहेत** असें जेव्हां कळतें तेव्हां मृग या मोठ्या गटांतील एकसूत्र ध्यानात येतें. प्रस्तुत विवेचनाच्या अनुषंगानें हेंहि कळून येतें कीं मृग, कुरंग, सारंग, पृषत, इत्यादि शब्द उत्पन्न झालेले आहेत ते निरर्थक गोंधळाचे किंवा भारूडभरतीचे नाहींत; ते सार्थ आणि सुसूत्र असून त्याच धर्तीवर आणखीहि अनेक शब्द शास्त्रनिर्मितीसाठींच नवीन तयार करणें अवश्य आहे.

---

## प्रकरण तिसरें

# गो-गवय इत्यादि युग्मखुरी

गो म्हणजे गाय किंवा बैल. हा माणसानें फार प्राचीन काळापासून पाळलेला प्राणी आहे. वैदिक वाङ्मयांत गाईबैलांचे उल्लेख विपुल आहेत. दुधाकरतां गाई आणि शेतीकरतां बैल यांचा उपयोग सतत होत आला आहे. युरोपांत सुद्धां प्राचीन काळीं शेतीकरतां बैल व घोडे आणि दुधाकरतां गाईच उपयोगी पडत. हल्लीं शेतीकरतां किंवा वाहनें ओढण्याकरतां बैलांचा उपयोग कमी होत चालला आहे. युरोपांत तर तो नाहींसाच झाला आहे. परंतु तिकडे दुधाकरतां गाईशिवाय अन्य पशु नाहीं. भारतांत मात्र गाईपेक्षां म्हशीच्या दुधाचा वापर अधिक आहे. तरी गाईची जोपासना दुधाकरतां म्हणून सुद्धां बरीच होत आहे आणि अधिक होणें अवश्य आहे.

युरोपमध्यें जी पाळीव गाय आहे ती बिनवशिंडाची आणि सपाट पाठीची आहे. भारतांत जी पाळीव गाय आहे तिला वशिंड असून तिची पाठ मागें चढती आहे. युरोपांतील वन्य गो पाळीव जातीपेक्षां रूपानें विशेष भिन्न नाहीं. भारतीय पाळीव गाईंतच अगोदर प्रकार पुष्कळ आहेत. कराचीची निवळ तांबडी गाय; थरपारकरची भुरकट पांढरी गाय; पंजाबांतील काळसर पिंगट रंगाची गाय; काठेवाडी उंच कपाळाची, जाड बोथट शिंगांची, धिप्पाड, तांबड्यांत पांढऱ्या ठिपक्यांची ( शबल ) गाय; जाड बोथट शिंगांची पण शुभ्र रंगाची गुजराथी कांक्रेज गाय; कोचदार शिंगांची पण शुभ्र वर्णाचीच अमृतमहाल गाय; आणि इतरत्र आढळणाऱ्या बारीक बांध्याच्या आणि विविध वर्णांच्या गांवठी गाई; या सर्वांना वशिंड आणि पोळी या दोन गोष्टी असतातच. युरोपीय गाईला त्या नसतात. पाळीव गाईंत इतक्या पोटजाती देशभेदानें आणि संगोपनभेदानें झाल्या आहेत हें उघड आहे. पण या सगळ्या पाळीव गाई कोणत्या वन्य गाईपासून प्रथमतः निष्पन्न झाल्या हा एक वादग्रस्त प्रश्न आहे.

### १ चमर–चमरी. आ. १

भारतीय वनांत चमरी नांवाचे पशू आहेत. त्यांना वनगाई म्हणतात. त्यांना वशिंड आणि पोळी या दोनहि गोष्टी नाहींत. चमर हे चांगले धिप्पाड पुरुषभर उंचीचे असतात. त्यांची वसति तिबेटांत मुख्यतः **लडाख**-मध्यें आहे. कधीं कधीं ते भटकत भटकत पूर्व कूर्माचलावर ( कूर्माचल = कुमाऊन ) येतात. पण त्याहून खालीं उतरत नाहींत. त्यांना थंडी चांगली सोसते; इतकेंच नव्हे तर त्यांना थंडीच आवडते. थंडीच्या दिवसांत पाणी नाहींसें होऊन केवळ बर्फच उपलब्ध होतें तेव्हां ते बर्फ खाऊन तहान भागवतात. किंचित् उबारा येऊन बर्फाला पाझर फुटले म्हणजे ते या पाझरामध्यें हौसेनें स्नान करतात. ते खालच्या प्रदेशांत उतरतात ते पाण्या-करतां नव्हे, खाण्याला कांहीं पाहिजे म्हणून. अति उंच जागीं अति थंडींत गवतसुद्धां अगदीं खुरटें आणि तेंहि कोठेंतरी थोडकेंसेंच असतें. गवताखेरीज ते दगडफूल खातात. तेंहि दुर्मिळ झालें तर ते खालीं उतरतात. त्यांच्या अंगावर हात हात लांब केस असतात. त्यांचा रंग काळा असतो. यांच्याच केसांचीं गंगावनें करतात. ( वनगाय–गंगावन ? ). देवावर किंवा राजावर जीं **चामरें** ( चौऱ्या ) ढाळतात तीं या **चमरांच्याच केसांचीं** असतात.

गंगावनें काळी असतात पण **चवऱ्या पांढऱ्या** असतात. वनगाईचे केस सरसकट काळे असतात. केवळ तोंडाभोंवतीं किंचित् पांढरी रेषा असते. कांहीं पाळीव चमरांचे केस केवळ काळे असतात तर कांहींचे इतरत्र काळे पण शेपटावर आणि छातीवर मधून मधून पांढरे असतात. यांतील पांढऱ्या केसांच्या चवऱ्या करतात. गांवगाय आणि वन्य चमर यांचा संगम झाला म्हणजे त्यांची जी संतति उत्पन्न होते त्या संततींत कांहीं पशू केवळ काळ्या रंगाचे असतात, तर कांहीं त्यांच्या मातेला अनुसरून अंशतः इतर रंगाचे असतात. ही संकरसंतति आकारानें चमरांपेक्षां लहान होते, पण तिच्या अंगीं उन्हाळा सोसण्याचा गुण मातेकडून येतो आणि हिंवाळा

सोसण्याचा गुण पित्याकडून येतो. अशा रीतीनें ही संतति ती पाळणाऱ्या लोकांना विशेष उपयोगी होते. लदाखी आणि काश्मीरी लोक अशाच पशूंचा उपयोग हिमालयापार कयावयाच्या प्रवासाकरतां करतात.

यस्यार्थयुक्तं गिरिराजशब्दं कुर्वन्ति बालव्यजनैश्चमर्यः ॥ कुमारसंभव १. असें हिमालयाचें वर्णन कवीनें केलें आहे तें अगदीं यथार्थ आहे. चमरी स्वभावानें भिऱ्या असतात. बिचकल्या म्हणजे त्या शेपट्या वर करून धावूं लागतात. पाळीव गाईचाहि स्वभाव असा असतो. चमरीच्या शेपटीचे केस पुष्कळच लांब असतात आणि त्यांची वसति अगदीं उंचांत उंच ठिकाणीं असते. तेव्हां त्या नगाधिराजाच्या डोक्यावर चौऱ्या ढाळतात हें खरेंच आहे.

## २ गवय, गवा

गोसदृशो **गवयः** । हें वाक्य फार प्रसिद्ध आहे. गवय म्हणून एक गाईसारखा दिसणारा पशु आहे. त्याचीं शिंगें गाईसारखीं असतात, केस गाईसारखे असतात. नराचा रंग काळसर किंवा अगदीं काळा आणि मादीचा पिंगट असतो; परंतु इतरत्र रंग कोणताहि असला तरी कोपराखालचे पाय पांढरेच असतात. वासरें गाईच्या रंगाचीं असतात. नरांचाच रंग प्रौढपणीं काळवंडत जातो. साधारण पाळीव गाईपेक्षां या गवयांचा सांगाडा बराच मोठा असतो. त्यांत विशेष हा कीं खांदा मागील ढोपरापेक्षां ठेंगणा असून खांद्यावर हाडांचा हातभर लांब आणि वितभर उभा कंगोरा असतो. थोड्या कमी मानानें असा कंगोरा मादीच्या अंगावरहि असतो. दोन शिंगांमध्यें कपाळ उंचट असतें. हे पशू दिसावयाला भव्य असून मारकट नसतात. हे माणसाला भिऊन पळूं लागतात. यांची वसति डोंगराच्या उतारावर टेकडामधून असते. टेकडांच्या माथ्यावर गवत असतें तेथें हे चरावयास जातात आणि छायेकरतां किंवा निवाऱ्याकरितां दरींतील झाडींत उतरतात. अंग धिप्पाड असलें तरी यांच्या खुरांची रुंदी थोडकीशीच

असते. टणक जमिनीवर हिंडण्याच्या योग्यतेची एकंदर बांधणी असते.

हे पशू दहा बारा जणांचे कळप करून राहातात. कळपांत एक मोठा बैल, कांहीं अल्पवयी खोंड, कालवडी आणि गाई-वासरें असतात. खोंड प्रौढ झाल्यावर कळपांतच गोपतीशीं त्यांच्या मारामाऱ्या होऊन एका विजयी वीराखेरीज इतरांना कळप सोडून जावें लागतें. असे पराभूत बैल आपला वेगळा कळप करतात. वृद्ध बैल कधीं कधीं तुटक राहतात.

भारतांतील सर्व वनांत हे पशू पूर्वी विपुल होते. परंतु अलीकडे ते कमी होऊं लागले आहेत. हिमालयाच्या पायथ्याच्या टेकाडावर अद्याप बरेच गवय आढळतात. आसामांतील पाळीव गाईशीं गवयांचा संकर वारंवार होतो. अशी संकरसंतति चांगली कांटक निपजते म्हणून मुद्दाम तशी संधि येऊं देतात. गवय स्वतः मात्र माणसाळत नाहीं.

## ३ महिष, म्हैस

दुभत्या जनावरांमध्यें आपल्या देशांत म्हैस श्रेष्ठ ठरली आहे. गाई-प्रमाणें म्हशींचेहि बरेच प्रकार आहेत. आकारानें भव्य आणि दुधाळपणांत अप्रतिम अशा दिल्लीच्या आणि जाफराबादी अशा दोन थोड्या भिन्न जाती प्रसिद्ध आहेत. त्यांचीं डोकीं उंच आणि शिंगें वाटोळी असतात. दिल्ली म्हशीचीं शिंगें वरच्यावर वळलेलीं असतात तर जाफराबादीचीं शिंगें कानाखाली मानेच्या शेजारीं वळलेलीं असतात. मेहसाण जातीची म्हैस आकारानें त्याहून लहान असून तिच्या शिंगाला मानेसरसेंच चंद्रकोरी वळण असतें. वऱ्हाडी म्हशी बांध्यानें मध्यम असून त्यांचीं शिंगें मेहसाणा-सारखींच पण अधिक लांब असतात. पंढरपुरी म्हशीचीं शिंगें मानेखालीं उतरलेलीं असून अगदींच वेड्यावांकड्या वळणाचीं असतात. याखेरीज बारीक बांध्याच्या साधारण मेहसाणी वळणाच्या गांवठी म्हशी सर्वत्र आढळतात. या झाल्या पाळीव म्हशी. ओलसर आणि दलदलीच्या भारतीय रानांत वन्य महिष सर्वत्र आढळतात. त्यांचा बांधा गांवठीच्याच वळणाचा

असतो. आकार मात्र फारच मोठा एक पुरुषभर उंचीचा असतो. वन्य आणि अवन्य सर्वांची संगत सहज घडते आणि त्यापासून संततीहि उत्पन्न होते. मुळांतच रूपभेद विशेष नसल्यानें संततींत वेगळेपणा आढळत नाहीं.

गाई-म्हशींमधील रूपभेद परिचयाचाच आहे. तथापि एक दोन गोष्टी विशेष लक्षणीय म्हणून सांगण्यासारख्या आहेत त्या अशा. म्हशीचे केस गाईच्यापेक्षां विरळ, राठ आणि लांब-लांब असतात. म्हशीचा बांधा अधिक जाड असून पावलें तर विशेषच रुंद असतात. गवय टेकाडावर हिंडणारे आहेत. त्यांचे खूर निरुंद असतात. म्हशी दलदलींत राहणाऱ्या आहेत, त्यांचे खूर रुंद असतात. चिखलांत चालण्याला रुंद खुरांचीच आवश्यकता असते. गवय भित्रे असतात. माणसाला पाहून ते पळून जातात. महिष धीट असतात. वन्य महिष शेतांत घुसण्यास कमी करीत नाहींत. वेळीं ते माणसाच्या अंगावर धावून येतात. ‘मारकी म्हैस’, ‘गरीब गाय’ या म्हणी वन्यांना अनुलक्षून उत्पन्न झालेल्या आहेत. महिष वाघाशीं सामना देण्यास कचरत नाहींत. नुकत्याच जन्मलेल्या आपल्या अपत्याच्या संरक्षणार्थ एका म्हशीनें वाघास धुडकावून लावल्याचें पाहण्यांत आलें आहे.

**४ अजाविक शेळ्यामेंढ्या.** आ. १० ते १५

**अजापुत्रं** बलिं दद्यात् । ही पुरातन म्हण आहे. वैदिक कालापासून **अजा** ( शेळी ) आणि **अवि** ( मेंढी ) यांना बळी देण्याचा प्रघात आहे. या दोनहि पशूंचें मांस खाद्य असून कातडें अनेक कामांकरतां उपयोगी पडणारें आहे. याशिवाय अजा दूध देतात आणि अवि **ऊर्णा** ( वूल ) देतात. म्हणून त्यांचे कळपच्या कळप पाळण्याची वहिवाट आहे. हे दोनहि पशू मूळचे डोंगराळ किंवा रेताड रूक्ष प्रदेशांतले आहेत. तुर्कस्थानापासून सिंधापर्यंतचे यावनी प्रदेश आणि पश्चिम हिमालयाचे उंचवटे, या ठिकाणीं वन्य अजाविकांची वसति आहे. भारतीय अजांपैकीं सर्वांत मोठे अज लदाखमध्यें आहेत. त्यांची उंची (खांद्यापाशीं) ४०″ असते. त्यांना

२

**साकिन** ( छाग, शेळी ) म्हणतात. याच्या खालोखाल सिंधी अज ३७" उंच असतो. यापासूनच पाळीव बकरी झाली असें म्हणतात. यांचें चालू नांव **सारा** असें आहे. याखेरीज मार्खोर आणि **ताहर** अशा दोन अजजाती आहेत. कांहीं ताहर हिमालयावर राहतात, तर कांहीं निलगिरीवर राहतात.

उत्तम मेंढ्या काश्मिरांत आहेत. त्याच्या खालोखाल पंजाबांत आणि त्याच्या खालोखाल सिंधांत आहेत. त्यांचें पंजाबी नांव **उरियल** (उरण, उरभ्र, एडका) असें आहे. यांची उंची साकीनाइतकीच असते. यांची संगत पाळीव पशूंशीं सहज घडते आणि त्यापासून उत्तम संतति चालू राहते. म्हणून पाळीव मेंढ्या यापासून झाल्या असाव्या असें म्हणतात. याखेरीज तिबेटी आणि रशियन जाती उत्तर हिमालयापर्यंत पसरलेल्या आहेत. त्यांपैकीं रशियन जातीला **मेष** ( मेंढी ) हें नांव प्रचलित आहे.

**अजाविकांना** अत्यंत थंडी आणि अत्यंत उन्हाळा सहन करावयाचा असतो. हिवाळ्यांत त्यांच्या अंगावर लांब लांब केस येतात ते गळून जाऊन उन्हाळ्यांत नवे आखूड केस येतात. अजांपेक्षां अवींचे केस मऊ असतात. दोनहि वर्गांत शिंगी आणि बिनशिंगी जाती आहेत. शिंगी जातींत नरांपेक्षां माद्यांचीं शिंगें लहान असतात, किंवा मुळींच नसतात. अवींच्या खुरांच्या दुबेळक्यांत **गंधग्रंथी** असतात. त्यांच्या योगानें त्यांच्या वसतीला किंवा रानाला विशेष गंध येतो. या गंधामुळें स्वजातीयांच्या स्थलाची ओळख त्यांना पटते. कांहीं अजांच्या पुढल्या पायांच्या खुरामध्यें अशा ग्रंथी असतात, मागल्यामध्यें नसतात. याखेरीज अवींच्या डोळ्यांखालीं आणि जांघाडामध्यें गंधग्रंथी असतात; अजांच्या नसतात. मत्त अजाच्या सर्वांगालाच एक उग्र गंध येतो, तो त्याच्या स्वेदग्रंथींतून. पाळीव अजा आणि अवि यांच्यांत जितका भेद असतो तितका वन्यांत नसतो. **दोहींची उत्पत्ति एकाच पूर्वजांपासून** झाली असावी असें म्हणतात.

## ५ टाकिन, सेरो आणि गोरल. आ. १६ ते १८

हिमालयाच्या माथ्यावर संचार करणाऱ्या पशूंमध्यें कांहींसे अजाविकांसारखे आणि कांहींसे कुरंगासारखे असे हे तीन पशू आहेत. यांपैकीं टाकीन ४२″ उंच असतात. सेरो उंचीनें तितकेच पण गोरल बरेच कमी २८″ असतात. टाकीनांचे पाय गवयांपेक्षां बोजड असतात. सेरो आणि गोरल यांचे पाय शेळ्यामेंढ्यांसारखे असतात. सेरो आणि गोरल यांचीं शिंगें चिंकारासारखीं असतात, तर टाकीनांचीं बकऱ्यांसारखीं असतात. सेरोच्या डोळ्याखालीं गंधग्रंथी असतात. गोरलांच्या मुखवट्यावर अशा ग्रंथी नसतात पण खुरांमध्यें असतात.

टाकीन ३००० ′ ते १०००० ′ उंचीवर मोठे कळप करून राहतात.
सेरो ६००० ′ ते १०००० ′ उंचीवर बहुधा एकाकी राहतात.
गोरल ३००० ′ ते १०००० ′ उंचीवर लहान कळप करून राहतात.

## ६ पाळीव गाई-म्हशी

येथवर सांगितलेल्या सर्व पशूंपेक्षां **कुरंग-हरिण** पुरातन आहेत म्हणून कुरंगापासून हे सर्व पशू निपजले असें शास्त्रज्ञ मानतात. यांपैकीं गो आणि अजाविक हे महत्त्वाचे पाळीव पशू आहेत. यांपैकीं कोणता अगोदर माणसाळला हें सांगतां येत नाहीं. आर्य लोकांनीं भरतभूमींत येतांना तीनहि पशू आपल्याबरोबर आणले होते असें दिसतें. सर्वांत जुने आर्यसंस्कृतीचे अवशेष मोहेंजोदारो येथें सांपडतात. त्यांत वशिंडाच्या आणि बिनवशिंडाच्या अशा दोनहि प्रकारच्या बैलांचीं चित्रें नाण्यांवर उमटलेलीं आढळतात. यांतला बिनवशिंडी पशु कदाचित् वन्य असेल पण **वशिंडी पाळीवच** असला पाहिजे. पाळीव वशिंडी बैलांचे उल्लेख वाङ्मयांतहि आहेत. तेव्हां आर्य लोकांनीं पाळीव वशिंडी बैल मध्य आशियांतून भारतांत आणले असें कांहीं विद्वानांचें मत आहे. पाळीव गाय गवयापासून उत्पन्न झाली असावी असेंहि कांहीं विद्वान् मानतात.

वन्य बैलाला वशिंड नसतांना पाळीव बैलाला तें कां उत्पन्न झालें असा येथें प्रश्न उत्पन्न होतो. त्याचें उत्तर असें कीं त्याच्या **मानेवर जूं** ( धुरा ) ठेवल्यानें. युरोपामध्यें गेल्या दोनशें वर्षांत गाईचें संवर्धन दुधाकरतां झालेलें आहे. त्याच्या योगानें गाईचा दुधाळपणा पराकाष्ठेला गेलेला आहे. गाई-बरोबर बैलांनाहि मंदपणा आणि बोजडपणा आलेला असून त्यांचा रोगा-संबंधीं सोशिकपणा बराच कमी झालेला आहे. बैलांचें संवर्धन धुर्य म्हणून न करतां केवळ मांसाकरतांच केलेलें आहे; त्यामुळें त्यांच्यांत वशिंड उद्भवलेलें नाहीं.

भारतांत **गाईचें संवर्धन दुधाकरतां** आणि **बैलाचें धुरेकरतां** होत आलेलें आहे. यांपैकीं प्रथमतः दुधापेक्षां धुर्यगुणाकडेच विशेष लक्ष कित्येक हजार वर्षे अधिक दिलें गेलें असल्यामुळें बैल उत्तम धुर्य बनले असून त्यांना वशिंड उत्पन्न होऊन तसें वशिंड अल्पत्वानें गाईलाहि मिळालेलें आहे. गाईचा दुधाळपणा मात्र मध्यम मानाचाच किंवा त्याहूनहि कमीच राहिला आहे. विलायतेंत रोजीं दहा शेरांहून कमी दूध देणारी गाय गवळ्याच्या गोठ्यांत ठेवण्याला अयोग्य समजतात, तर भारतांत दहा शेर दूध देणारी गाय उत्तम समजली जाते. तथापि बैल केवळ बैठे न वाढवता कामाला लावल्यामुळें ते कांटक बनले आहेत. विशेषतः त्यांची **रोगप्रतिकारिता** चांगल्यापैकीं असून ती त्यांच्या संततींतहि उतरते, हा एक बहुमोल लाभ आहे.

भारतांत चांगल्या दुधाळ गाई पंजाब, सिंध आणि काठेवाड येथेंच निर्माण झाल्या आहेत, इतरत्र नाहींत. नेमके याच जातीचे बैल बलिष्ठ पण मंद झाले असल्याचें आढळतें. दक्षिणेंत म्हैसूरमध्यें गाईकडे दुभत्याच्या दृष्टीनें लक्ष न देतां केवळ धुर्य बैल मिळविण्याच्या दृष्टीनें गोधन वयांत येईपर्यंत राखीव रानांत वाढविण्याची पद्धत आहे. तेथें जनावरांना गोठ्यांतल्यासारखे ऐदी राहून चालत नाहीं, चाऱ्याकरतां हिंडावें लागतें

आणि शत्रूपासून संरक्षण करण्याकरतां दक्ष असावें लागतें. म्हणून त्यांच्या अंगीं चापल्य चांगलें बाणलें आहे, आणि त्यांचीं शिंगें कोचदार झालीं आहेत. डुलत डुलत चालणाऱ्या उत्तरभारतीय बैलांचीं शिंगें बोजड आणि बाजूनें वळणदार किंवा पाठमोरी बनलीं आहेत. दक्षिणी बैल अर्धवन्यच आहेत म्हटलें तरी चालेल. अर्थातच तेथील गाईमध्यें दुधाळपणा अगदींच कमी, हें साहजिक आहे.

गाईच्याप्रमाणेंच म्हशींवर संवर्धनाचा परिणाम झालेला आहे. रेड्या-वर धुर्य म्हणून संस्कार नसल्यामुळें **म्हशींत पराकाष्ठेचा दुधाळपणा** उतरला आहे. **बैलाचा धुर्य गुण गाईच्या दुधाळपणाला आड येतो** असें म्हणावें लागतें. तथापि तसें असलें तरी त्याबरोबर कांटकपणा येत असल्यामुळें दुधाळपणांत थोडें न्यून पत्करणें हें इष्टच आहे. यांत्रिक वाहनामुळें बैलांच्या चापल्याचा उपयोग उत्तरोत्तर कमी होत आहे. शक्तीचा उपयोग आहे. दुधाळ गाईपासून शक्तिमान् बैल निपजूं शकतात तेव्हां तसा उपयोग होत राहीलच.

### ७ वराह, डुकर

हा प्राणी खेड्यापाड्यांतील घाण खाणारा आणि शेताभातांचा नास करणारा म्हणून प्रसिद्ध आहे. हा इतर पशूंहून बराच निराळा आहे. म्हणून याचा एक स्वतंत्रच गण केलेला आहे. याला गाईम्हशीप्रमाणें दोन खूर असतात, पण हा रवंथ करीत नाहीं. रवंथी जनावरांच्या पोटांत चार कोठे असतात. पण डुकराच्या पोटांत एकच कोठा असतो. डुकराच्या खालच्या वरच्या दोनहि जबड्यांत चांगले **कोचदार सुळे** असतात. रानटी जातींत ते तोंडाबाहेर येतात. गाईम्हशींना वरच्या जबड्यांत पुढचे (कातरे) दांत मुळींच नसतात. **रवंथी पशूपेक्षां** डुकरें **पुरातन** आहेत. पुरातन सांगाडे सात जातींचे सांपडले आहेत. त्यांतल्या एका जातीचे सर्व जगांतील वराहांत अधिक मोठे आहेत.

## उपसंहार

गो, चमर, गवय, महिष, अजाविक, वराह या सर्वांमध्यें **कळप करून राहण्याची वृत्ति** हरिणांतल्याप्रमाणेंच आढळून येते. कळपाचें आधिपत्य एका पतीकडेच असावें, असाहि त्यांचा निर्धार दिसतो. यामुळें नरांमध्यें मोठे झगडे होतात असें दिसून येतें.

गाईची व म्हशींची जोपासना दुधाकरतां झाली तशी शेळ्यांची झालेली दिसत नाहीं असें नाहीं. परदेशांतल्या उत्तम शेळ्या भारतीय सामान्य दुभत्या गाईइतक्या दुधाळ आहेत. भारतांत मेंढ्यांचें सगोपन लोकरीकरतां चालू आहे. परंतु तेंहि परदेशाच्याइतकें प्रगत झालेले नाहीं. भारतीय मेंढी रानमेंढीपेक्षां पुष्कळ लहान झाली आहे. काश्मीर व पंजाब यांखेरीज इतरत्र रानमेंढ्या नसल्यानें त्यांच्यांत नवें कणखर रक्त येण्याला संधि फार थोडी आहे. वरील दोन प्रांतांखेरीज इतरत्र तर मुळींच नाहीं. इतर प्रांतांत जेथें रूक्ष रानें आहेत तेथें वन्य अजाविक आणून सोडून ते तेथें राहतात किंवा कसें तें पाहण्याजोगें आहे. साधारणतः अजापेक्षां अवी पुष्कळ दुर्बल झालेल्या आहेत. त्यांचें मांसहि वारंवार रोगग्रस्त असल्याचें आढळतें. **अजमांस सहसा रोगग्रस्त आढळत नाहीं. तें क्षयरोगापासून पूर्णपणें अलिप्त असतें.** या दृष्टीनें तें अविमांसापेक्षांच काय पण इतर कोणत्याहि मांसापेक्षां श्रेष्ठ आहे. यावरून असें अनुमान निघतें कीं **शेळीचें दूध** देखील इतर दुधापेक्षां अधिक आरोग्यकारक असावें. **क्षयरोगाच्या प्रतिबंधाकरतां** त्याचा उपयोग करून पाहणें सयुक्तिक आहे. या धोरणानें त्याचा प्रचार होणें अवश्य आहे.

---

## प्रकरण चौथें

# हत्ती-घोडे इत्यादि अयुग्मखुरी

हत्ती पाळणें हें मोठ्या वैभवाचें चिन्ह आहे असें पन्नास वर्षांपूर्वीं समजत असत. हत्ती हा आकारानें आणि बुद्धीनेंहि मोठाच आहे. नर आणि वानर हे त्याच्यापेक्षां बुद्धीनें श्रेष्ठ आहेत पण आकारानें त्याच्या तोडीचा देखील कोणीच नाहीं. या यंत्रयुगांत त्याची उपयुक्तता बरीच कमी झाली आहे. तरी वनांतील मोठमोठे लांकडाचे ओंडे ओढणें आणि ढकलणें हीं कामें आज देखील त्याजकडून करून घ्यावीं लागतात. पूर्वीं युद्धामध्यें हत्ती फारच उपयोगी पडत. गेल्या महायुद्धांत मलाया आणि ब्रह्मदेश या ठिकाणीं त्यांचा तसा उपयोग झालाहि होता. मोठमोठे दोर, सांखळ्या, अंकुश, अशा साधनांशिवाय हत्ती पकडणें आणि वागविणें शक्य नाहीं. म्हणून गाई, शेळ्या, मेंढ्या यांच्यामागून तो माणसाळला गेला असावा, असें अनुमान निघतें.

### **गज.** आ. १९

हत्तीच्यासारखा **शुंडावन्त** पशु दुसरा नाहीं. त्याला सोंडेचा उपयोग हातासारखा होतो म्हणून त्यास **हस्तिन्** आणि **करिन्** अशा संज्ञा मिळाल्या आहेत. हत्तीच्या सोंडेला दोन बाजूंला दोन भले मोठे दांत असतात म्हणून त्याला **द्विरद** आणि **दन्तिन्** अशीं नांवें मिळालीं आहेत. हत्ती पाणी पितांना प्रथम तें सोंडेंत घेतो आणि नंतर तें तोंडांत ओततो, म्हणून त्याला **द्विप** म्हणतात. हत्ती आपली सोंड नागाच्या डोक्याप्रमाणें उंच उभारूं शकतो म्हणून त्याला **नाग** असेंहि नांव पडलें आहे. हीं सर्व वर्णनात्मक नांवें झालीं. हत्तीचें मूळचें नांव **गज** असावें असें दिसतें.

आज हत्ती फक्त आशिया आणि आफ्रिका या दोनच खंडांत आहेत. आशिया खंडांतील हत्ती हिंदुस्थान आणि त्याच्या पूर्वेचे देश यांतच तेवढे

आहेत. भारतीय वन्य हत्ती मध्यहिमालय, पूर्वहिमालय, आसाम आणि मलयस्थली या विभागांत आहेत. या हत्तीची उंची १० फूट असते. हत्तिणीची एखादा फूट कमी असते. हत्तीचे सुळे आठ ते नऊ फुटांपर्यंत वाढूं शकतात. अशा दांताचें वजन १६० पौंड भरतें. हत्तिणीचे सुळे अगदींच आखूड असतात किंवा मुळींच नसतात. लंकेंतील हत्तीला (नराला) देखील सुळे नसतात.

आफ्रिकन हत्तीला तसेच हत्तिणीलाहि मोठाले सुळे असतात. त्यांची पाठ खोलगट असते, त्यांचे कान मोठाले असतात, सोंडेच्या शेवटीं दोन टोकें असतात, आणि मागील पायाला तीन बोटें असतात. भारतीय हत्तीच्या सोंडेला एकच टोक असतें, आणि मागील पायाला चार बोटें असतात. सर्व हत्तींच्या पुढल्या पायाला पांच बोटें असतात. हत्तीच्या पायाचा नखाशिवाय इतर भाग एका पिशवीत भरल्यासारखा सळनळीत असतो. हत्तीची त्वचा राठ असून तिजवर बाळपणीं दाट मऊ आखूडसे केस असतात. वर्षानंतर ते गळून पडतात आणि दुसरे उगवतात. ते विरळ, लांबट आणि राठ असतात.

हत्तीच्या मोठ्या दांतांना **सुळे** म्हणतात तें शास्त्रीय दृष्ट्या सदोष आहे. दांतांची गणती मानवी दांतांच्या ठेवणीवरून करण्याची रीत आहे. मानवी मुखांत एका जबड्यांत एका अंगाला मध्याशीं दोन **कातरे**, त्या शेजारीं एक **सुळा** आणि त्याच्या मागें दोन **उपदंष्ट्रा** आणि तीन **दंष्ट्रा** असा आठांचा संच असतो. याच रीतीनें गणती केली असतां हत्तीच्या मुखांत सुळे मुळीच नसतात. कातरे दांत २ × ४ असावयाचे. त्यांपैकीं वरच्या जबड्यांतले दुसऱ्या क्रमाचेच तेवढे दोन असतात, तेच मोठे होतात. त्यांनाच सुळे म्हणतात, सुळे हे उस्कडण्याचे दांत होत; हत्तीला त्यांचा कांहीं उपयोग नसतो. कातरे हे कातरण्याचे दांत होत; त्यांचाहि हत्तीला कांहीं उपयोग नसतो. **कातऱ्यांपैकींच दोन दांत** बाहेर वाढून येतात.

त्यांचा उपयोग खुपसण्याकरतां किंवा रेटण्याकरतां होतो. हत्तीला शिरशिरी आली म्हणजे तो आपल्या दांतांनीं आणि मस्तकानें खडकावर टक्कर देतो. ही त्याची लीला **वप्रक्रीडा** या नांवानें कवि वर्णितात. हत्तीहत्तींची झुंज होते तेव्हां अर्थात् या दांतांचा उपयोग भरपूर होतो. सुळे म्हणजे **सुळके**, निमुळते, या अर्थीं येथें सुळे हा शब्द योग्य आहे. त्याचप्रमाणें **फोडणें** या अर्थीं रद् धातु असल्यामुळें येथें **रद** हाहि शब्द यथार्थ आहे.

दाढा आणि उपदाढा हे भरडण्याचे दांत होत. हत्तीला ६ × ४ दाढा येतात. पण केव्हांहि एका जबड्यांत एका अंगास **२ पेक्षां अधिक दाढा नसतात.** दोहोंच्या मागें तिसरी उमटते आणि पहिली पडून जाते असा क्रम चालतो. पहिली दाढ वयाच्या २ ऱ्या वर्षीं, दुसरी ६ व्या वर्षीं, तिसरी ९ व्या वर्षीं, चवथी २० ते २५ व्या वर्षीं आणि पांचवी ६० व्या वर्षीं पडून जाते. सहावी उर्वरित आयुष्यभर टिकते. हत्तीच्या दाढा **एकावर एक चकत्या** रचून झालेल्या असतात. चकत्या झिजत जातात तसतसे त्याखालीं **आडवे कंगोरे** उघडे पडतात. हे कंगोरे मधल्या बांधणीच्या गात्राचे असतात. आफ्रिकन जातींत हे कंगोरे ११ पेक्षां अधिक नसतात. हिंदी जातींत ते २७ पर्यंत पाहण्यांत आले आहेत.

हत्तीचे मुष्क पोटांतच असतात; ते खालीं उतरत नाहींत. हत्तीला वृषण नसतें. हत्तिणीला दोन स्तन असतात ते तिच्या पुढील पायांमध्यें असतात. तिचें बालक स्तनाला तोंड लावून पितें; सोंडेनें पीत नाहीं. हत्तिणीचा गर्भ वीस महिने पोसावा लागतो. अनेक हत्तिणी एका कळपांत राहतात. पिल्लांचें संगोपन करण्यामध्यें सर्व एकमेकींना साहाय्य करतात. हत्ती बहुधा त्यांच्या-बरोबर राहतो, पण कधी कधीं आजूबाजूला भटकतो. दोन प्रौढ हत्ती मात्र एका कळपांत राहत नाहींत. बालहत्ती कळपांत राहतात. कळपाचें पुढारीपण एखाद्या वृद्ध हत्तिणीकडे असतें.

दाट झाडी आणि मुबलक पाणी असलेल्या जंगलांत हत्तींची वसति

असते. त्यांना झाडपाला आणि विशेषतः बांबूचे अंकुर फार आवडतात. बांबूच्या खोडाला **स्तंब** म्हणतात. त्यावरून हत्तीला **स्तंबेरम** असें म्हणतात. हत्तींना पाण्यांत खेळण्याची हौस असते. उन्हाच्या वेळीं ते छायेंत विसांवा घेतात. हत्तींचीं घ्राणेंद्रियें आणि श्रवणेंद्रियें हीं इंद्रियें विशेष तीक्ष्ण असतात. रात्रीच्या वेळीं पिकांत घुसून ते कधीं कधीं पिकांचा नाश करतात. हत्ती अरुंद पाऊल-वाटेनें सहज चालतात आणि पळण्यांतहि चलाख असतात.

आकार आणि बल या बाबतींत सर्वश्रेष्ठ अशा या पशूच्या अंगी सामाजिक गुणहि श्रेष्ठ प्रतीचे आहेत. त्याचा मुखवटा असामान्य आहे, म्हणून आपण आपल्या एका दैवताला **गजमुख** कल्पिलेलें आहे. **गजानन** हा आपण **पशुपतीचा पुत्र** समजतों.

**मतंगज.** आ. २० व २१

आज भारतांत एकाच जातीचे गज सांपडतात; पण भारतभूमींत निगूढ झालेले गजांचे सांगाडे तपासले असतां त्यांत सात जाती आढळतात. यांखेरीज आणखी आठ जातीचे मतंगजांचे सांगाडे सांपडले आहेत. रशियांतील सैबेरिया नामक प्रदेशाच्या उत्तरपूर्व भागांत मतंगजांचीं परिपूर्ण शवें सांपडलीं आहेत. बर्फांत बुडाल्यामुळें तीं अविनाश स्थितींत राहिलीं हें उघड आहे. त्यांची कवटी उंचट व निमुळती आहे. त्यांचे सुळे प्रथम एकमेकांपासून दूर पुढें गेलेले, मग वरती आणि शेवटीं एकमेकांकडे वळलेले आहेत. वयानें कमी असलेल्यांचे सुळे विद्यमान गजांच्या सारखेच आहेत. मतंगजांच्या कातडीवर मऊ दाट आखूडसे केस असून त्याशिवाय गाल, पोट आणि कुशी येथें बऱ्याच लांबट भरड केसांचे पुंजके आहेत. कानांवर मऊ लव आहे.

गजांच्या पूर्वजांचे सांगाडे चारी खंडांत सांपडतात. यावरून पूर्वकाळीं हत्तींच्या वसतीला योग्य भूमि तेथें होती, पण नंतर परिस्थिति पुष्कळ ठिकाणीं बदलत जाऊन अवशिष्ट गज दोनच खंडांत राहिले असें अनुमान

निघतें. गजांच्या पूर्वजांचे सांगाडे वेगवेगळ्या युगांतले सांपडले आहेत. त्यावरून त्यांची वंशपरंपरा ठरवितां येते. आरंभीं ठेंगणे आणि बिनतोंडी गज होते; मग अर्धसोंडी, नंतर पूर्णसोंडी गज निपजले. सोंड नव्हती तेव्हां तोंड लांबट होतें. सोंड आली आणि तोंड आखूड झालें. सोंड नव्हती तेव्हां मान लांबट होती. सोंड आली आणि मान आखूड झाली. अर्धसोंडी गजांना वरच्या तसे खालच्या जबड्यांतहि दोन दोन सुळे असून त्या सुळ्यांच्या मध्यें जबडाहि लांबडा आहे. **मतंगज** उत्तरेंतून दक्षिणेस मलाया प्रदेशांत गेले आणि तेथून **ब्रह्मदेशमार्गें भारतांत** शिरले असा इतिहास आहे. कांहीं दक्षिणी मतंगजांचे सांगाडे १४ फूट उंचीचे आहेत. या अवाढव्य आकारावरून मातंग म्हणजे अवाढव्य असा लाक्षणिक अर्थ झालेला आहे ( उदाहरणार्थ, मातंगनक्र. रघुवंश १३.११ ).

**अश्व.** आ. २२

हत्तीच्या खालोखाल पाळीव घोडा हें वैभवाचें चिन्ह गेल्या पंचवीस वर्षांपूर्वीं मानीत असत. मोटारगाडी आल्याने त्याचें महत्त्व कमी झालें आहे. विश्वासू द्रुतवाहन म्हणून त्याचा उपयोग अद्याप होत आहे आणि तसाच आणखी पन्नास वर्षें तरी होत राहील यांत शंका नाहीं. त्वरेनें जाणारा म्हणून त्याला **तुरग, तुरंगम** अशीं नांवें पडलीं आहेत. युरोपांत त्वरेप्रमाणें बलाकरतांहि घोड्यांचा उपयोग करीत असत. रथाला तसे औतालाहि घोडेच जोडीत. एकोणिसाव्या शतकांत अश्वाच्या ऐवजींच प्रथम वाफेचें इंजिन वापरलें गेलें. त्यावरून इंजिनाचें सामर्थ्य अमुक अश्वां-इतकें असें मोजण्याचा प्रघात उत्पन्न झाला. राजाचें चतुरंग बल म्हणजे पदाति, **सादि, रथी** आणि गजी असें असे. त्यांपैकीं सादि म्हणजे घोडेस्वार हा पुष्कळ वेळां रथी किंवा गजी याहीपेक्षां अधिक महत्त्वाचा असे. उत्तर भारतांतील मैदानावरचें काय तो रथयुद्धाचा महिमा होता;

इतरत्र त्याचा उपयोग सादी आणि गजी यांपेक्षां कमीच होऊन तो कालांतरानें नाहींसा झाला. इंग्रजांशीं लढणारे मराठे उत्तम सादी होते.

मृगया करणाऱ्याला घोड्याइतकें उत्तम वाहन अद्यापिहि दुसरें नाहीं. परंतु घोड्यावर बसून मृगया करण्यापूर्वीं माणसें घोड्यांचीच मृगया करून त्यांचें मांस खात असत! फ्रान्स देशांतील गुहांमधील पुराण-अवशेषांत घोड्यांचीं हाडें ( आंतल्या ओषटाकरतां ) चिरून टाकलेलीं सांपडतात. घोडे स्वभावतः गवताळ पठारावर राहणारे आहेत. अशीं पठारें पूर्वीं **मध्य आशिया** व युरोप येथें विपुल होतीं. तेव्हां तेथें वन्य घोडे विपुल होते. आतां ते केवळ **पश्चिम मंगोलियांत** राहिले आहेत. ४००० वर्षांपूर्वीं घोडे बाबिलोनिया आणि इजिप्त या देशांत आले. तेथून फक्त पाळीव घोडेच भारतांत आले. गाई पाळीव झाल्यानंतर शेंकडो, किंबहुना हजारों वर्षांनीं घोडे पाळीव झाले असावे असें अनुमान आहे. कारण पाळीव गाईंचे जितके जुने अवशेष आहेत तितके जुने पाळीव घोड्यांचे अवशेष नाहींत. आज भारतांत वन्य घोडे कोठेंहि नाहींत, पाळीव आहेत. ते सुद्धां उत्तरोत्तर कमकस होतात. म्हणून वरचेवर अरबस्थान वगैरे देशांतून ते नवीन आणण्याची चाल आहे. भारतीय युद्धांत उत्तम अश्वदल शकुनीचें होतें तें **गांधार** देशांतून आणलें होतें. मराठेशाहींत **अरबी** घोडेच विशेष वाखाणले जात असत. अरबी घोडे देखणे, कांटक आणि चपलहि असतात. त्यांची उंची ५ फूट असते.

आज मंगोलियांत जे वन्य घोडे आढळतात त्यांचें रूप पाळीव घोड्यांहून कांहींसें वेगळें आहे. त्यांचें शेपूट खेचरासारखें, पाय गाढवासारखे, कान पाळीव घोड्यासारखे आहेत. या वन्य घोड्यांची संगत पाळीव घोड्यांशीं सहज घडते आणि त्यांना संतति होत राहते. वन्य घोड्यांची संगत गाढवांशींहि घडते. त्यापासून होणारीं अपत्यें **खेचरें** असून तीं **वंध्य** असतात. वन्य घोड्यांची संगत झिब्र्यांशींहि घडते. त्यापासून होणारीं

अपत्येंहि वंध्यच असतात. भारतांत वन्य झिब्रा नाहीं. तो आफ्रिकेंत आहे. भारतांत वन्य गाढव आहे तें कच्छांत आणि त्याच्या वायव्येच्या प्रदेशांत आहे. कच्छरणांत जीं लहान लहान हिरवळीचीं स्थळें आहेत तेथें अशा २५ ते ३० पशूंचे कळप चरतांना आढळतात. या पशूंची आयाळ आणि त्यापासून शेपटापर्यंत एक चिंचोळी पट्टी, यांचा रंग काळा असतो. पोट पांढरें असतें. इतरत्र रंग करडा असतो. उंची ४ फूट असते. एकंदर ठेवण पाळीव गाढवासारखीच असते. त्यांना **घोर-खार** असें नांव आहे. **गर्धभ** आणि **खर** या शब्दांवरून हा जोडशब्द निघालेला दिसतो. गाढवें घोड्याप्रमाणें पुष्कळ अगोदर माणसाळलीं असावींत. लदाख आणि तिबेट येथें थोड्या वेगळ्या प्रकारचीं रानगाढवें आढळतात.

**खड्ग, गेंडा.** आ. २३ व २४

गेंडा हा पशु भला मोठा पुरुषभर उंच, अंगानें ढबू आणि एकंदर रूपानें ओंगळ आहे. त्याचे कान घोड्याच्या कानासारखे असतात. त्याचें तोंड लांबट असतें. त्यावर एक किंवा दोन **शिंगें**, एकामागें दुसरें अशीं असतात. तीं **केवळ त्वचेंतून उगवलेलीं** असतात. त्यांना एक हाडाची बैठक असते इतकेंच. हाडाचा गाभा नसतो. शिंगें धकाधकीनें मोडतात पण पुनः उगवतात. त्यांची वाढ जन्मभर होतच असते. गेंड्याचें कातडें राठ असून अंतराअंतरावर पक्क्या सुरकुत्या पडून त्याचे स्पष्ट सपक विभाग पडलेले दिसतात. त्यांपैकीं खांदा, पाठ आणि ढुंगण हे मोठाले विभाग होत. गेंड्याचे पाय हत्तीच्या पायांप्रमाणें खुंटवजा असतात. पण त्यांना तीनच बोटें असतात. गेंड्याची शेंपूट हत्तीच्या शेंपटीसारखी आंखूड आणि गोंडेदार असते. हत्तीला सोंड व दांत यांमुळें जें सौंदर्य येतें तें गेंड्याला नसतें. गेंडा हा **ओंगळपणाचा पुतळाच** असतो !

जीवनार्थ संचार करण्याकरतां पशूंना पायच तेवढे उपयोगी आहेत म्हणून शास्त्रीय वर्गीकरणामध्यें **पायाची ठेवण** हा एक महत्त्वाचा मुद्दा

आहे. हत्तीची सोंड हा त्याचा असामान्य विशेष आहे म्हणून शुंडावन्त असा त्याचा एक स्वतंत्र गण केलेला आहे. इतर पशूंचे गण त्यांच्या खुरावरून **युग्मखुरी** आणि **अयुग्मखुरी** असे केले आहेत. घोड्याच्या पायाला एकेकच खूर असतो म्हणून त्याला अयुग्मखुरी म्हणतात. गेंड्याला तीन बोटें असतात. म्हणून तोहि अयुग्मखुरी ठरतो. खूर आणि बोट रचनादृष्ट्या एकच. गो, गवय, हरिण इत्यादि पशु युग्मखुरी होत. त्यांच्या पांच बोटांपैकीं अंगठा नाहींसा झालेला असतो, दुसरें आणि पांचवें बोट खुरटें झालेलें असतें, आणि तिसरें आणि चवथें यांचे खूर बनलेले असतात.

मलाया देशांत **तापीर** म्हणून एक बिनशिंगी गेंडेवजा बराच ठेंगणा पशु आहे. त्याच्या पुढल्या पायास चार आणि मागल्यास तीन बोटें असतात. म्हणून तो वस्तुतः **युग्मायुग्मखुरी** होय. पण संकेतानें त्यास अयुग्मखुरी म्हणतात. गेंडा पूर्ण शाकाहारी आहे. तो दाट जंगलांत राहातो. तथापि उघड्या गवताळ जागेंत हिंडतांनाहि आढळतो. एखाद्या ठराविक ठिकाणींच विष्ठा टाकण्याची संवय असल्यामुळें तो विशेष दूरवर जात नाहीं. विष्ठेच्या ढिगाकडे मागें मागें सरकत जातो. त्यामुळें शिकारीस सुलभ आहे.

आज गेंडे भारतांत केवळ **नेपाळ** आणि **आसाम** याच प्रांतांत आहेत. त्यांचे सांगाडे हिमालयाच्या शिवालिक रांगेंत सर्वत्र विपुल आढळतात; परंतु ते केवळ वरच्या थरांत. म्हणून हेहि पशू हत्तीप्रमाणें आसाममार्गें भारतांत आले असा तर्क होतो.

## प्रकरण पांचवें

# उंदीर बिंदीर

उंदीर हे मानवाचे सहवासी आहेत. उंदराशिवाय मानवी वसति नाहीं. मानवाच्या घरांतच उंदीर राहतात. ते आपल्या सोईचीं बिळें करून घेतात. अडगळींत आपलीं घरटीं बांधतात. ते मानवाचें अन्न खातात, इतकेंच नव्हे तर कापड, कागद इत्यादि वस्तूंचा नाश करतात. सगळ्या घरांत संचार करतां यावा म्हणून ते भिंतींत सोयीस्कर बोगदे पाडतात. तें न साधल्यास दाराच्या फळ्यांत कमानी कोरतात किंवा छतांत छिद्रें पाडतात. कोणत्या ना कोणत्या रीतीनें माणसांचा सहवास घडेल असें करतात. मांजर आणि मुंगूस हे त्यांचे मनुष्यवस्तींतील शत्रू होत. माणसांच्या घरांतून बाहेर पडतील तर त्यांना आणखी शत्रू भरपूर भेटतील. घार, गिधाड, पिंगळा, घुबड, कावळा, साप, कोल्हा या प्राण्यांचें सुलभ भोजन म्हणजे उंदीर.

गांवांत राहणारे गांवठी उंदीर तसे रानांत रानटी उंदीर कांहीं कमी नसतात. शेतांत राहणारे शेत-उंदीर आणि जंगलांत राहणारे जंगली उंदीर यांचा भरणा पुष्कळ मोठा असतो. गांवठी उंदरांप्रमाणें रानटी उंदरांपैकीं कांहीं बिळें करून राहतात, तर कांहीं झाडावर घरटीं बांधून राहतात, आणि कांहीं झाडांच्या खोडांत बिळें करून राहतात. कांहीं उंदीर केवळ दगडांच्या सापटींत राहतात.

उंदीर आणि घुशी मिळून एक मोठा वर्ग होतो. त्यास उंदीरवर्ग म्हणूं या. उंदीर, मूष, अंगानें लहान असतो. घूष त्याहून मोठा दुप्पट किंवा अधिकहि असतो. घूषाची शेपूट अंगाइतकीच लांब किंवा थोडी कमी आधिक असते; बहुधा कमीच असते. मूष आणि घूष दोघांच्याहि शेपटीस केस विरळ असतात. शेपटीच्या टोंकाला तर अगदींच विरळ असतात किंवा नसतातहि. आकृतीनें उंदिरासारखेच पण शेपटी केसाळ असून

शेवटीं थोडासा गोंडा असणारे प्राणी आहेत त्यांना गोंडे उंदीर किंवा संक्षेपानें गोंदीर म्हणावें.

### आखु, गोंदीर ( Gerbille ). आ. २५

गोंदीराची लांबी नाकापासून शेपटापर्यंत ५ ते ७ इंच असते. त्याचे मागले पाय विशेष मोठे असतात. त्यामुळें त्याला बरीच मोठी उडी मारतां येते. ते सहसा उड्या मारीतच संचार करतात. त्याची उडी ४ ते ५ फूट अगदीं सहज पडते. ते शेताच्या कुंपणांत किंवा कधीं कधीं अगदीं उघड्या मैदानांत देखील उड्या मारीत जातात. बिळाला जोडून एक कोठडी करतात ती साधारणतः भुईखालीं एका हातावर असते. कोठडीपलीकडे बीळ लांबवलेलें असून ती लांबण खालपट असते. त्यामुळें बिळांत पाणी आलें तरी कोठडींत जात नाहीं. कोठडी बिळाशीं एका फाट्यानें जोडलेली असते. कोठडीला पळवाटा असतात. पळवाटांचीं तोंडें भुसभुशीत मातीनें बंद केलेलीं असतात. आयत्या वेळीं ती माती सहज उसकडतां यावी इतकी सैल केलेली असते. झाडपाला, फुलें, बिया, हेंच गोंदीरांचें मुख्य खाद्य असतें; पण याखेरीज ते बारीक सारीक किडे आणि त्यांचीं अंडीं खातात. ते आपल्या बिळांत धान्याचा थोडाबहुत संचय करून ठेवतात. शेतीभातींत राहणारे ( उपवन्य ) गोंदीर रात्रीं संचार करतात. अरण्यांत राहणारे ( आरण्य ) गोंदीर दिवसा देखील संचार करतात. आकारानें उपवन्य आरण्याहून अमळ मोठे असतात.

### घूषक, ढिगारी घूस ( Mole Rat ). आ. २६

शेताभातांत वारंवार आढळणारी घूस ती ही होय. हिचें अंग ६–७″ आणि शेपूट ५–७″ लांब असतें. या घुशीचा विशेष स्वभाव असा आहे कीं आपल्या बिळाच्या दाराशीं एक मोठा मातीचा ढिगारा करून ठेवावयाचा. या स्वभावरूनच तिला ढिगारी घूस हें नांव पडलें आहे. ही

घूस आपल्या बिळाला जोडून अनेक कोठड्या करते आणि त्यांत पुष्कळ धान्य सांठवते. बिळाला पळवाटाहि पुष्कळ असतात. हिचें बीळ ३०-४० हात लांब असल्याचें आढळून आलें आहे.

### घूषिक ( Metad, Soft-furred Field Rat )

मेताद या नांवाची एक घुशीची जात आहे. आकारानें घूषकापेक्षां ती लहान असून तिचें अंग आणि शेपूट लांबीनें सारखींच असतात. या घुशी तांदूळ आणि कापूस या पिकांना फार त्रास देतात. यांचीं बिळें कुंपणांत असतात. यांना निवडुंगाचें कुंपण फार प्रिय आहे. या निवडुंगाचीं फळें खातात.

### घूषूक, झुडपी घूस ( Bush Rat )

ही घूस बरीच लहान असते. हिची लांबी अवघी ४" असते. शेपटाची लांबीहि तितकीच असते. हिचें घरटें काड्या, गवत, इत्यादिकांनीं एखाद्या झुडुपाच्या फांद्यावरती रचलेलें असतें. क्वचित् तें झुडपाखालीं भुईवरहि असतें. हिला टणटणीचीं फळें फार आवडतात.

### घूषुक, रानघूस ( White tailed Wood Rat )

झुडपी घुशीपेक्षां ही घूस मोठी असते. हिची लांबी ६-७" असते. या घुशीची शेपटी अंगापेक्षां थोडीशी अधिक लांब असून तिजवरील शेवटच्या केसांचा रंग पांढरा असतो. इतरत्र रंग भुरका असतो. ही आपलें घरटें एखाद्या झाडाच्या ढोलींत किंवा फांद्यांच्या सापटींत बांधते. क्वचित् एखाद्या खडकाच्या कपारींतहि हिचें घरटें आढळतें.

### काळी घूस, घूष, साधी घूस ( Common House Rat )

मनुष्यवस्तींत राहणारी घूस ती ही होय. लांबी, अंग ६-७", शेपूट तितकेंच. ही घूस व्यापारमार्गें सर्व देशांत गेलेली आहे. हिचा मूळ देश मध्य आशिया. तेथें तिचा रंग काळा आहे. पण इतरत्र रंग वेगवेगळे

झालेले आढळतात. विविध देशांतील घुशींचें मूळस्थान एकच असावें या अनुमानाचें प्रत्यंतर घेतां येतें, तें असें. उंदरांच्या पिढ्या लवकर लवकर होतात. त्यांना पकडून देशांतराला नेऊन निरनिराळ्या परिस्थितींत ठेवलें असतां त्यांच्या संततीमध्यें रंग पालटत असल्याचें आढळतें. युरोपांत घुशींचा रंग पोटाकडे धूसर होतो. भूमध्य देशांत पाठ पांढरी आणि पोट धूसर होतें. त्याच देशांत अरण्यांत राहणाऱ्या घुशींचा रंग पाठीकडे पिवळा, पिंगट, तांबूस, असा कांहींतरी आणि पोट पांढरें, असा होतो.

भारतांत शुद्ध काळी घूस समुद्रकांठीं बंदरांत मात्र आढळते.

### घुघूष, पिंगट घूस ( Brown Rat )

ही घूस मध्य आशियांतून इकडे आली असें म्हणतात. या घुशीचें अंग मोठें ७-८" लांब आणि शेपूट त्याहून आंखूड असते. ही घूस घरांच्या जवळपास सांडपाण्याचे नळ व निचरणीच्या कुंड्या यांच्या आसऱ्यानें राहते. कधीं कधीं या घुशी भिंतींतून किंवा भुईवरच्या फरशांच्या खालून मोठालीं बिळें पाडतात.

घुशींना गारवा अवश्य असतो. उन्हाच्या तडाख्यानें त्या मरतात. त्या नाजूक असतात तरी चिडल्या म्हणजे मोठ्यानें घुरघुरत चिडवणाराच्या अंगावर धांवतात.

### मूषिक, शेतउंदीर ( Field Mouse ). आ. २७

या उंदरांची लांबी २-३" असून शेपूट त्याहून किंचित् आखूड असतें. यांपैकीं जे कोरड्या रानांत राहतात त्यांचा रंग पाठीकडे फिका पिंगा आणि पोटाकडे पांढरा असतो. दमट रानांत राहणारांचा रंग पोटाकडे पांढराच पण पाठीकडे दाट पिंगा असतो.

### मूषुक, काटेरी उंदीर ( Brown Spiny Mouse )

या उंदरांचे केस चपट्या काट्यासारखे राठ असतात. यांचा रंग पाठीकडे पिंगा आणि पोटाकडे पांढरा असतो. हे आपल्या बिळांच्या

तोंडाशीं गारगोट्या भरून ठेवतात. यांच्या कोठड्यांत देखील गारगोट्यांचें अंथरूण केलेलें आढळतें.

**मूष, झाडउंदीर** ( Long-tailed Tree Mouse ). आ. २८

या उंदराची लांबी २–२·५" असून शेपूट ३–४·५" लांब असतें. याचा रंग पाठीकडे तांबडा आणि पोटाकडे पांढरा असतो. हा आपल्या शेपटीनें झाडाच्या पानाचे देठ किंवा बारीक फांदी पकडून धरतो. याची वसति बहुशः झाडावरच असते. हा आपलें घरटें झाडावरच बांधतो. कधीं कधीं या उंदराची वीण पाकोळीच्या घरट्यांत आढळून येते. एकदां तर एका कोळ्यांच्या वसाहतींत जळमटांमध्यें या उंदरांची वीण झालेली आढळली आहे.

**मूषक, गांवठी उंदीर** ( House Mouse )

यांची लांबी २–३" आणि शेपूटहि तितकेंच लांब असतें. या उंदरांचें स्थान मध्य आशियांतील देश हेंच असून यांचा फैलाव आतां सर्व जगभर झालेला आहे.

याखेरीज आणखी अनेक जातींचे उंदीर मनुष्यवस्तींत राहतात.

**बांबू-घूस.** आ. २९

नेपाळ, सिकीम, आसाम इत्यादि प्रांतांत घुशीसारखा दिसणारा एक प्राणी आहे. त्याला बांबू-घूस असें म्हणतात. कारण तो बांबूच्या रानांत राहतो. त्याचा आकार मोठ्या घुशीएवढाच असून त्याची राहणी घुशी-सारखीच असते. त्याचे दांत घुशीपेक्षांहि मोठाले असतात. त्यांचा रंग पिंगा किंवा तांबडा असतो. शास्त्रज्ञांनीं या प्राण्याची जात आणि गोत्र देखील वेगळें लेखलें आहे.

**वृक्षशायिका, खार** ( Squirrel )

उंदरासारखें अंग, झुपकेदार शेपूट, पट्टेदार पाठ, पाणीदार डोळे असलेला हा चिमुकला अति चपळ प्राणी सर्वांनीं पाहिला असेलच. खारींत

जाती बहुत आहेत. कांहींच्या पाठीवर तीन पट्टे तर कांहींच्या पाठीवर पांच पट्टे असतात. हे प्राणी मनुष्यवस्तींतच पण झाडावर राहतात. त्यांची उडी सहजासहजीं १०-१५ हात पडूं शकते. त्यांचा आहार झाडपाला आणि फळें हाच असतो. कांहीं रानटी खारी भल्या मोठ्या असतात. त्यांचें अंग १४-१६" लांब आणि शेपूट तर २४" लांब असते. त्या रानांतच राहतात. कांहीं रानटी खारींना पंख देखील असतात; त्याहि आकारानें भल्या मोठ्या असतात.

**पंखवाली खार.** आ. ३०, ३१

वाघुळ हा पशु असून त्याला पंख आहेत हें प्रसिद्ध आहे, पण झाडांवर वसति करणारी जी चतुष्पाद खार तिच्या बांधवांत पंख असणारे प्राणी आहेत हें थोड्यांनाच माहीत असेल. म्हणून तें माहीत करून घेणें अवश्य आहे. रूपानें खारीसारख्या, आकारानें सामान्य गांवठी खारीपेक्षां पुष्कळ मोठ्या, आणि दोनहि बाजूंला पुढल्या मागल्या पायांत पसरणारे पंख असलेल्या खारींच्या जाती आहेत. यांपैकीं पांच जाती आकारानें बऱ्याच मोठ्या, नाकापासून पुच्छारंभापर्यंत हातभर आणि पुच्छ सव्वा हात अशा आहेत. आणखी चार जाती आकारानें त्यांहून लहान, नाकापासून पुच्छारंभापर्यंत वीतभर आणि पुच्छ सवा वीत, अशा आहेत. जातीजातींतील भेद रंगावरून आणि केसांच्या घाटावरून केले आहेत. बिनपंखाच्या खारी दिवसा भक्ष्य शोधतात आणि या पंखवाल्या खारी रात्रीं भक्ष्य शोधतात, असा एक स्वभावभेद आहे. बाकी सर्व खारींचा स्वभाव साधारण सारखाच असल्याचें आढळतें. पंखवाल्या खारी वन्यच आहेत; त्या उपवनांत कधींहि येत नाहींत. भारतांत हिमालयापासून त्रावणकोरपर्यंत सर्व प्रांतांत त्यांची वसति आहे.

खारींना जे पंख असतात ते त्यांना वर उडण्याला उपयोगी पडत नाहींत, तर ते त्यांना खालीं उडी मारतांना धपका कमी करण्याला

उपयोगी पडतात. हे पंख पसरून धरून खार खालीं उडी घेते आणि खालीं उतरल्यानंतर पंख आवरून घेते. हवेंतल्या हवेंत पंखांची उघड-झाप करणें तिला साधत नाहीं. विमानांतून अपघातप्रसंगीं उतरतांना छत्री किंवा पतत्राण उपयोगांत येतें तसेच हे खारीचे पंख पतत्राण म्हणून तिला उपयोगीं पडतात. **पतत्राण म्हणजे पतनानें जो अपाय होण्यासारखा असतो त्यापासून संरक्षण करण्याचें साधन.** पतत्र (पतनात् त्रायते इति) असा एक शब्द आहे त्यांत नेमका हाच अर्थ आहे. **खारीचे पंख म्हणजे निवळ पतत्रें असतात.** उत्पतत्र म्हणजे वर उडण्याचें साधन. तसे ते पंख नसतात. झाडावरून उतरतांना खारीला पंखांचा उपयोग आहे, चढतांना नाहीं.

## साळू, साळ (Porcupine). आ. ३२

हा प्राणी आपल्या कांटेरी केसांमुळें प्रसिद्धि पावलेला आहे. याच्या तोंडाचा घाट घुशीच्या किंवा ससाण्यासारखा असतो. तरी याचें चालणें मात्र सशाच्या किंवा घुशीच्यासारखें नसतें. मागले पाय दुमडून न ठेवतां उभे ठेवूनच तो चालतो. हा बिळें करून राहाणारा आहे. याची राहण्याची कोठडी ४'×४'×१८" इतकी प्रशस्त असते. झाडापाला, कंदमुळें हेंच याचें खाद्य आहे. हा आपल्या बिळांत जनावरांचीं हाडें आणि सांबरांचीं शिंगें यांचा सांठा करून ठेवतो. सांबरशिंगें हीं वस्तुतः हाडेंच असतात. मधून मधून हाडें चघळणें हा याचा स्वभावच आहे. या हाडांच्या आहारा-मुळें याचे केस पोसले जातात. हे केस आणि हाडें यांची रासायनिक घटना एकच असते.

साळ स्वभावानें भित्रे असतात. त्यांच्यावर कोणीं चाल केली तर स्वसंरक्षणार्थ ते आपल्या कांटेरी केसांचा उपयोग करतात. हे केस उभारले म्हणजे त्यांचा रोख मागें राहतो. म्हणून केस उभारून ते आपल्या शत्रूवर पाठमोरी चाल करतात. केस शत्रूच्या अंगांत टोंचल्यावर साळ पुढें

निसटतो. कांटेरी केस तसेच शत्रूच्या अंगांत टोंचून राहून साळाच्या अंगांतून सुटतात. ही चाल इतकी झपाट्यानें होते कीं साळ आपले केस बाणाप्रमाणें शत्रूच्या अंगावर फेकतो, असा गैरसमज उत्पन्न झाला आहे. सुटून गेलेल्या केसांच्या जागीं नवे केस हळू हळू उगवतात. शत्रूशीं प्रसंग न आला तरी केस थोडे अधून मधून गळून पडत असतातच. आकारानें लहान आणि स्वभावानें भीरु अशा या प्राण्यावर हिंस्र पशूंची धाड येणें साहजिक आहे. अशी कोणी धाड घातलीच तर त्याला साळांच्या कांटेरी केसांचा चांगलाच प्रसाद मिळतो. अशा साळाच्या वाटेस गेल्यानें मोठ्या वाघावरहि मृत्यु ओढवल्याचीं उदाहरणें शिकारी लोकांनीं पाहिलीं आहेत. मानेंत आणि छातींत कांटे रुतून गेले म्हणजे अगदीं विव्हल होऊन वाघ पाव घटकेंत प्राण सोडतो !

### शश, ससा ( Hare ). आ. ३३

पाळीव ससे सर्वांनीं पाहिलेच आहेत. रानससे त्यांच्यासारखेच असतात. त्यांचा रंग मात्र पिंगट असतो. मधून मधून कांहीं काळ्या रेषा असतात. त्याचे कान लांब लांब असतात. दूरचा आवाज ऐकण्यास ते त्यांना विशेष उपयोगी असतात. उंदरांप्रमाणेंच सशांना अनेक शत्रू असतात. त्यांपासून संरक्षण करण्याला पलायनाखेरीज उपाय नसतो. मधून मधून दोय पायांवर उभे राहून ते भोंवतालचा कानोसा घेतात आणि सभोंवार दृष्टिक्षेप करतात. त्यांना खालच्या जबड्यांत दोनच पण वरच्यांत चार कातरे दांत असतात. ते अर्थात् सर्वांत पुढें असतात. दाढा सर्वांत मागें असतात. मध्यें खिंड असते. चर्वण चालू असतांना त्या खिंडींत दोनहि गाल एकमेकांजवळ येतात. त्यामुळें बाहेरून गाल खोल गेलेले दिसतात.

सशांना संतति विपुल होते. पाळीव पांढऱ्या सशाच्या दोन माद्यांना एका वर्षांत ५० पिलें झालेलीं पाहिलीं आहेत. रानसशांना संतति याहून कमी होते असें म्हणतात. पाळीव ससे जन्मतः अंध असतात, रानससे डोळस असतात.

## शशुंदर ( Mouse Hare ). आ. ३४

कांहींसे उंदरांसारखे आणि कांहींसे ससासारखे कांहीं प्राणी हिमालयावर ८०००′ ते १४०००′ उंचीवर आढळतात. त्यांना हें नांव दिलें आहे. यांची लांबी ६″ ते ८″ असते. यांना शेपूट नसते. यांचा रंग लालसर किंवा पिंगा असतो. हे दगडांच्या राशींत लपून राहतात. हे झाडांच्या मुळापाशीं बिळें करतात पण त्यांतच राहतात असें नाहीं. दगडाच्या सापटींतहि राहतात. दगडाच्या राशीवर लपंडाव खेळणें ही त्यांची करमणूक आहे. परकीयांची किंचित् चाहूल लागली की पुरे, ते लगेच गडप होतात. पण थोड्याच वेळांत त्यांतला एखादा वर डोकावतो आणि मग भय न वाटलें तर सर्वांस खेळावयास बोलावतो. हे प्राणी झाडपाला, मुळें वगैरे खाणारे आहेत.

## मार्मोत ( Marmot ). आ. ३५

काश्मीर, नेपाळ, सिकीम इत्यादि भागांत राहणारा हा प्राणी मोठा विलक्षण आहे. याची लांबी दोन फूट असून शेपूट अवघी ५ इंच असते. कान फारच बारीक असतात. हा भुईंत बिळें करून राहतो. झाडपाला, मुळें हेंच याचें खाद्य आहे. हा १३०००′ पेक्षां अधिक उंचीवर राहतो. तेथें बर्फ पडलें तरी तो खालीं उतरत नाहीं, बिळांत जाऊन हिमनिद्रा घेतो. हिम वितळल्यावर जागा होऊन तो उद्योगाला लागतो.

## कृन्तक, कुरतडणारे ( Rodents )

उंदीर, घुशी, खारी, इ० प्राण्यांना कृन्तक असें म्हणतात. त्यांच्या दातांच्या रचनेवरून हा वर्ग केला असून दातांच्या उपयोगावरून हें नांव दिलेलें आहे. माणसाच्या तोंडांत सर्वांत पुढे जे चपटे दात असतात त्यांना कातरे म्हणतात. माणसाला कातरे दात आठ असतात, चार वर चार

खालीं. उंदरांना कातरे दात दोन वर दोन खालीं असे चारच असतात. तथापि ते अधिक चिंचोळे, अधिक कणखर आणि अधिक धारदार असतात. उंदीर आपलें खाद्य प्रथम या कातऱ्या दातांनीं कुरतडतो आणि मग त्याचें भुसकट दाढांखालीं चघळतो. सर्व कृन्तकांचें मुख्य खाद्य धान्य, झाडांचीं फळें, बिया, मुळें, हें असतें. तें रुक्ष आणि कणखर अशाच अवस्थेंत बहुधा आढळतें. त्याचा समाचार घेण्याकरतां अशा दातांचा उपयोग होतो. कृन्तकांच्या दातांना पटाशीची उपमा देतात; पण वस्तुतः पटाशीच या दातांपेक्षां हिणकस ठरते. पटाशी वापरल्यानें बोथटते; कृन्तकांचे दात बोथटत नाहींत, सुधारतात. त्यांची धार आपोआप पाजळली जाते.

कृन्तकांना जरी उत्तम धारेचे दात असले तरी त्यांचा उपयोग दुसऱ्या प्राण्यावर हल्ला करण्याकरतां किंवा दुसऱ्यांनीं केलेला हल्ला थोपविण्या-करतांहि ते करीत नाहींत. त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति संकट आलें कीं तेथून पळ काढणें हीच असते. आपल्या घराला पळवाटा योजून ठेवणें ही त्यांची उपजतबुद्धि आहे. पळवाट नसली किंवा असलेली बंद झाली म्हणजे मग मात्र दातांचा उपयोग शत्रूविरुद्ध करण्याचें त्यांना सुचतें. गंमत म्हणून कागद, कापड, लाकूड, इतकेंच काय पण जनावरांचे किंवा माणसांचे हातपाय (ते झोंप घेत असतांना) उंदीर कुरतडतात असें क्वचित् घडतें. पण तें अपवादात्मकच समजलें पाहिजे. उंदीर नाहीं असें घर नाहीं. अशी स्थिति असतांना असा प्रसंग कोणत्याहि घरांत पांच पन्नास वर्षांनीं एखादा, याहून अधिक येत नाहीं. यावरून उंदरांचा स्वभाव गरीब आणि भित्रा आहे हेंच सिद्ध होतें.

सर्व कृन्तकांमध्यें उंदीर विशेष बुद्धिमान् असतात. त्यांना पकडण्याची कोणतीहि एक योजना चिरकाल फलदायी होत नाहीं. एखादा फसला कीं इतर सर्वजण सावध होतात आणि तसल्या प्रकारें फशीं पडण्याचें टाळतात.

पिंजरे किंवा विषें नित्य नवीं वापरलीं तर त्यांना यश येण्याचा संभव असतो. उंदरांचें आयुष्य अल्प असल्यामुळें एकच युक्ति चार सहा महिने खंड ठेवून वापरली म्हणजे ती नवीच होते.

## उंदरांचा महिमा

माणसाचें मुख्य खाद्य धान्य हें आहे. तसेंच तें उंदरांचेंहि मुख्य खाद्य आहे. माणसें धान्य पिकवण्याचा उद्योग करून धान्य मिळवतात आणि उंदीर माणसानें पिकवलेलें चोरून खातात. या त्यांच्या चोरट्या गुणावरून त्यांना मूष म्हणजे चोरटा असें नांव मिळालें आहे. उंदरांचा हा चोरीचा उद्योग ते मोठ्या कुशलतेनें चालवितात. कोठाराला भोकें पाडणें हा त्यांचा स्वभावच आहे. एका शेतकऱ्यानें उंदरांच्या उपद्रवानें त्रासून सीमेंटमध्यें विटा रचून कोठार तयार केलें. धान्य आंत भरण्याकरतां माथ्यास भलें जड लोखंडी दार लावून ठेवलें, आणि रोजच्या रोज थोडें थोडें धान्य काढण्याकरतां भिंतींत भुईजवळ एक लहानशी वीतभर लांब रुंद खिडकी ठेवली आणि तीहि लोखंडाच्या झडपेनें बंद करण्याची सोय केली. उंदरांनीं त्या झडपेच्या सापटींतून धान्य काढून घेण्याची युक्ति योजली. उंदीर झडपेच्या सापटींतून पंजे घालून झडप नुसती हालवीत. तेवढ्यानें चार चार दाणे खालीं पडत. हा उद्योग ते रात्रभर चालवीत !

उंदरांच्या योगानें माणसाच्या खाद्याचा अतोनात नास होतो इतकेंच नव्हे तर उंदरांचे रोगहि माणसाला होतात. प्लेग हा भयंकर रोग प्रथम उंदरांना होतो आणि मग पिसवा तो माणसाच्या अंगीं लावतात. प्लेग हा रोग अतिशय लहान जीवांच्या योगानेंच होणारा आहे. या जीवांना प्लेग-जंतू असें आपण म्हणतों. मोठे जीव जसे उंदरांचे शत्रू आहेत, तसे हे लहानगे जीव देखील उंदरांचे शत्रू आहेत. या सर्वांच्या तडाख्यांतून कांहीं उंदीर वांचतात आणि आपली वंशावळ चालवतात. उंदरांना संतति विपुल

होते. उंदीर एका वर्षांत प्रौढ होतात. प्रौढांना दर वर्षी ३ ते ६ वेतें होतात. दर वेतांत ३ ते ६ पिलें होतात.

उंदरांचा सद्गुणच सांगावयाचा झाला तर तो **उद्योगीपणा** हा सांगता येईल. ध्वजावर एखाद्या प्राण्याचें चित्र काढावयाचें अशी जुन्या मानव-समाजाची चाल होती. त्या वेळीं एका दक्षिण भारतीय समाजानें मूषक हें आपलें ध्वजचिन्ह घेतलेलें होतें. या समाजांतील लोकांना मूषिक असें म्हणत. वैदिक वाङ्मयांत गणपतीचें ध्वजचिन्ह मूषक हेंच सांगितलें आहे. पुढें मूषक हें गणपतीचें वाहन मानूं लागले. आजच्या समाजांत ध्वजाचिन्ह म्हणून नव्हे आणि वाहन म्हणूनहि नव्हे, मानवी **आरोग्यविषयक प्रयोगाकरतां बळी** देण्याला म्हणून मात्र उंदरांची खास निवड झालेली आहे.

## प्रकरण सहावें

# छोटे हिंस्र

हिंस्र पशू म्हटलें कीं वाघसिंहांच्या मूर्ती डोळ्यांसमोर येतात. तथापि वाघ-सिंहांहून पुष्कळ लहान असून हिंसा करण्यांत कुशल असे पशू पुष्कळ आहेत. ते दररोज आपल्या आसपास हिंडत असतात. कुत्रीं, मांजरें हिंस्र आहेत. त्यांपैकीं जीं मनुष्यवस्तींत राहतात तीं बरींच सौम्य झाली आहेत. त्यांना माणसाच्या शाकाहाराचा वांटा मिळत असतो. त्यांचे बांधव जे रानांत राहतात ते केवळ मांसाहारच करतात. पक्षी, ससे, उंदीर, घूस, हें त्यांचें नित्याचें खाद्य असतें. रानकुत्रा अंगानें लहान खरा पण बळानें मोठा असून संघ करून राहतो. त्यामुळें त्याला मोठमोठ्या पशूंची मृगया करतां येते. तो मोठमोठीं सांबरे मारतो इतकेंच नव्हे तर अस्वल आणि वाघ यांचाहि समाचार घेण्यास मागेंपुढें पाहात नाहीं. अस्वल बहुशः शाकाहारी आहे पण प्रसंगीं मांसाहारीहि आहे. तें आकारानें कुत्र्यापेक्षां बरेंच मोठें असतें. कुत्रा आणि अस्वल हे मध्यम हिंस्र होत. कुत्र्याच्या आकाराचे किंवा त्याहूनहि लहान असे बरेच पशू आहेत. ते छोटे हिंस्र होत.

### १ चिचुंदर ( Musk Rat ). आ. ३६

सर्वांत छोटा हिंस्र पशु म्हणजे चिचुंदर. तो उंदराप्रमाणें दिसतो. चिवचिवतो म्हणून त्याला चिचुंदर म्हणतात. तथापि तो उंदरापेक्षां बराच निराळा आहे. चिचुंदराचें तोंड उंदरापेक्षां अधिक टोंकदार असून कान वाटोळसर असतात. उंदराचे कान तसे नसतात. चिचुंदराच्या तोंडाचें टोक तांबूस असतें; पंजेहि तांबूस किंवा पांढुरके असतात. तसे उंदराचे नसतात. उंदीर पोक काढून चालतो. चिचुंदर पाठ पसरून चालतो. चिचुंदराची हनुवटी उंदरापेक्षां पुष्कळ आखूड असते. चिचुंदराचे वरचे

कातरे ( पुढले ) दात वळणदार असतात आणि खालचे कातरे सरळ पण पुढें रोखलेले असतात. उंदीर शाकाहारी तर चिचुंदर मांसाहारी आहे. चिचुंदर बहुधा आपल्या घराबाहेर राहतो; पण केव्हां केव्हां घरांतहि येतो आणि मोठ्या धिटाईनें वागतो. आपण भोजनास बसलों असतां आपल्या पाटाखालीं लपून राहून मधून मधून ताटांतलें अन्न चोरून घेण्यास तो कमी करीत नाहीं. चिचुंदराचें विशेष आवडतें अन्न म्हणजे झुरळें, बागुरडे, वगैरे कीड होय. चिचुंदरास उंदराचीं पिलेंहि मारून खाण्याची संवय असते. यामुळें ते माणसाला उपकारकच ठरतात. चिचुंदरी प्रवास करतांना तिचीं पिलें तिच्या शेपटीस धरून राहतात.

चिचुंदराच्या अंगाला घाण येत असते. ही घाण उत्पन्न करणाऱ्या ग्रंथी त्याच्या कुशींत असतात. आपल्याला विशेष भीति वाटली म्हणजे अंगास घाम सुटतो तसाच चिचुंदरांना भीतीनें घाम सुटतो पण तो या विशेष घाणवाल्या ग्रंथीतून. या घाणीमुळें मांजर या प्राण्याच्या वाटेस जात नाहीं. त्याला या दुर्गंधाचा तिटकारा येतो.

### २ कुपणडुकर ( Hedge Hog ). आ. ३७

लहानशा डुकराच्या पिलासारखा दिसणारा आणि कुंपणाच्या किंवा इतर रानांतल्या झुडपाच्या आसऱ्यानें राहणारा एक पशु आहे त्याला हें नांव दिलें आहे. याची लांबी सरासरी वीतभर असते. याला एक अगदीं लहानशी शेपूट असते पण ती त्याच्या पाठीवर असलेल्या कांटेरी ढापणा-खालीं लपून राहते. हें कांटेरी ढापण म्हणजे या प्राण्याचें संरक्षण-साधन असतें. या ढापणाखालीं मांसतंतूंची रचना अशा बेताची झालेली असते कीं, तो तें ढापण आपल्या तोंडावरहि ओढून घेऊं शकतो. कासवाला भीति वाटली म्हणजे तें आपल्या पायांचा आणि मानेचा संकोच करून पाय आणि तोंड पाठीखालीं लपवतें. परंतु हें कुपणडुकर आपलें पाठढापण तोंडावर ओढून घेतें. पाय आखडून पाठीच्या खालीं ठेवतां येतातच. अशा अवस्थेंत

हा पशु म्हणजे निव्वळ एक कांटेरी गोळा होऊन राहतो. मग त्याला हात लावण्याची कोणाची प्राज्ञा आहे ?

ही स्वारी दिवसा बिळांत किंवा गवतांत लपून राहते आणि रात्रीं संचारार्थ बाहेर पडते. कुपणडुकर भक्ष्य शोधतां शोधतां दुडक्या चालीनें बराच दूरवर प्रवास करतात. त्यांचें भक्ष्य म्हणजे मुख्यतः कृमी, कीटक, उंदीर, पाली व सरडे असलेंच असतें. मधून मधून ते मुळाफळांचाहि आहार करतात. त्याच्या बोटांना प्रखर नखें असतात.

या पशूंच्या दोन जाती आहेत. एकीचा रंग दाट पिंगा असतो, दुसरीचा फिका असतो. सिंध, पंजाब आणि कच्छ या प्रांतांत त्यांची वस्ती फार आहे. त्या मानानें दक्षिणेंत फार कमी आहे. क्वेटा प्रांतांत राहणारे कुपणकडुर हिवाळ्यांत महानिद्रा ( हिमनिद्रा ) घेतात.

## कीटाद ( Insectivores )

चिचुंदर आणि कुपणडुकर यांखेरीज उंदीर-घुशीच्याच आकाराचे अनेक जातींचे असे पशू आहेत की ते बहुशः कृमिकीटकच खाऊन राहतात. या सर्व पशूंचा एक वर्ग गणला असून त्यास कीटाद असें नांव दिलें आहे.

## ३ खवली मांजर, पांगोलीन ( Scaly Ant-eater ). आ. ३८

तोंडाखेरीज सर्व अंगावर खवले असलेला एक मुंग्याखाऊ प्राणी आहे. त्याला खवली मांजर म्हणतात. तो गांवठी मांजरापेक्षां बराच मोठा असतो. त्याचें अंग दीड हात लांब असून शेपूट एक हात लांब असते. या प्राण्याचें रूप इतकें विलक्षण असतें कीं, तें एकदां पाहिल्यावर विसरण्याचा संभव नाहीं. तोंड निमुळतें असतें आणि डोक्यापासून मागें सर्वत्र मोठाले खवले असतात. शेपूट सुद्धां जाडजूड असून तिजवर खवले असतात. अशांतहि ती विळखा घालण्याजोगी लवचीक आणि भक्कम असते. याच्या पंजाला कोचदार नखें असतात. त्यांच्या योगानें त्याला माती उकरतां येते. याच पंजाच्या योगानें त्याला झाडावरहि चढतां येतें. या कामांत तो अगदीं

पटाईत असतो. नखें रोचून झाडाच्या सालींत घुसवतां येतात. शिवाय शेपटीचा विळखा घालून झाडाच्या बुंध्याची किंवा फांदीची पकड घेतां येते. अशा रीतीनें निर्भयपणें त्याला झाडावरच्या मुंग्या चाटतां येतात.

या प्राण्याला दात मुळींच नसतात. याला एक लांबलचक जीभ असते. त्या जिभेला अतिशय चिकटा असतो. जिभेनें एकदां मुंग्या चाटल्या म्हणजे त्या मुंग्यांना मरणाखेरीज गत्यंतर नसतें. साध्या मुंग्या, काडमुंग्या, मुंगळे, उधई ( वाळवी ) हें याचें नित्य खाद्य होय. पण याखेरीज तो गांडूळ किंवा गोगलगाई खातो. या प्राण्याच्या आहारास दातांची गरज नसते, हें उघडच आहे. हा प्राणी इतर प्राण्यांहून इतका वेगळा आहे कीं, याचा एक स्वतंत्र वर्ग कल्पिला असून त्या वर्गाला अदन्त असें नांव दिलेलें आहे.

या प्राण्याच्या अंगावरचे खवले हेंच त्याचें संरक्षणाचें साधन होय. स्वखाद्य प्राण्यांच्या खेरीज इतरांच्या वाटेस हा जात नाहीं. याच्या वाटेस कोणी गेलाच तर तो आपलें अंग वळणदार करून तोंड शेपटीनें झाकून घेतो. असें केल्यानें सर्वत्र खवल्यांचेंच गुंडाळें तयार होतें !

पांगोलिन दिवसा भुयारांत लपून राहतात आणि रात्रींच आहारविहाराकरतां हिंडतात; त्यामुळें ते सहसा आपल्या दृष्टीस पडत नाहींत. हिमालयाच्या दक्षिणेस रानोरानीं यांची वसति आहे.

### ४ हिमालयीन वीझेल

हिमालय हा फार मोठा पर्वत भारताच्या उत्तर सीमेवर पसरलेला आहे. त्याची उंची इतकी मोठी आहे कीं त्याच्या पायथ्याशीं रखरखीत ऊन असलें तरी माथ्यावर हिमाचें आवरण असतें. उष्ण, अनुष्ण, शीत, अशा तीनहि प्रकारचीं वातावरणें या पर्वतावर अनुभवावयास मिळतात. पूर्व आणि मध्य हिमालयावर पाऊसहि भरपूर पडतो. त्या पाण्याचे ओघ सर्वत्र पसरतात, आणि अगणित झाडांझुडांचें पोषण करतात. या वनश्रीच्या आश्रयानें पशुपक्षीहि अगणितच आहेत. बारीकसारीक कृमि

कीटकांसंबंधीं तर बोलणेंच नको. त्यांची भरती इतकी आहे कीं त्यांच्यावर यथेच्छ ताव मारणाऱ्या हिंस्र पशूंना अन्नाची टंचाई कधीं भासत असेल असें संभवत नाहीं. वनश्रीवर पोसणारे कीटक आहेत तसे कृन्तकहि आहेत. कृन्तक म्हणजे कुरतडणारे– उंदीर, घुशी, खारी इत्यादि. हिमालयांत कांहीं विशेष जातीचे कृन्तक आहेत त्यांना 'शशुंदर' असें नांव दिलें आहे कारण त्यांची आकृति अंशतः उंदरासारखी आणि अंशतः सशासारखीहि असते. त्यांना शेपूट मुळींच नसतें. हिमालयावर जसे विशेष जातीचे कृन्तक आहेत तसेच कांहीं कृन्तकांचे अन्तकहि आहेत. त्यांना वीझेल म्हणतात. अशा कृन्तकान्तक जातींपैकीं एकीचें नांव एरमाईन असें आहे.

## **एरमाईन** ( Ermine ). आ. ३९

एरमाईन आकारानें साधारण मांजराएवढें, किंबहुना त्याहूनहि लहान असतें. त्याची लांबी शेपटीसह एक हातभर असते. त्यांपैकीं तृतीयांश लांबी शेपटीचीच असते. एरमाईनची आकृति सफाईदार वळणाची असते. तिच्यांत काचाकोचा मुळींच नसतात. यामुळें त्यांना सांधीकोपऱ्यांत किंवा बिळांत घुसणें सहज सोपें जातें. झाडावर चढण्यांत ते कुशल असतात. बहुधा ते आपलें भक्ष्य जमिनीवर किंवा जमिनीच्या आंतच मिळवतात. ते फार धीट आणि क्रूर असतात. आपल्यापेक्षां भारी प्राण्यावर झडप घालण्यास ते कचरत नाहींत. एकदां झडप घातली म्हणजे पकडलेला पशु किंवा पक्षी ठार केल्याशिवाय ते ती सोडीत नाहींत. या पशूंचा रंग हिवाळ्यांत पांढुरका असतो. पण इतर दिवसांत तो बदलतो. पाठीकडे तो दाट पिंगा होतो; पोटाकडे पांढरा होतो. पुढचे पंजे नेहमींच आणि मागले बहुधा पांढरे असतात. या पशूंच्या अंगाला दुर्गंधी येते, त्यामुळें त्यांच्यावर झडप घालण्यास कोणी सरसावत नाहीं. मोठ्या शत्रूशीं प्रसंग आला तर ते मुद्दाम अधिक घाण सोडतात. या घाणीची उत्पत्ति गुदाच्या-भोंवतीं असलेल्या ग्रंथींतून होतें.

मोठ्या हिंस्रांना हे प्राणी घाणेरडे म्हणून आगाऊच माहीत झालेले असल्यामुळें दुरूनच रंगावरून त्यांना ओळखून ते वेगळया वाटेनें निघून जातात.

**५ रातेल, बोलरींच, शवखण** ( Ratel ). आ. ४०

हे पशु लहानशा अस्वलासारखे दिसतात म्हणून त्यांना रींच ( ऋक्ष ) म्हणतात. बोल किंवा बाल हा शब्द रींच या शब्दाच्या मागें जोडला आहे तो लहान आकारावरून आलेला दिसतो. हा पशु शवें उकरून खातो म्हणून त्यास शवखण असेंहि नांव दिलें आहे. याचें अंग हात सवा हात लांब असून शेपूट वितीपेक्षां जरा आखूडच असतें. याचे पंजे भक्कम असून त्यास तीव्र नखें असतात. त्यांच्या योगानें तो भराभर माती उकरूं शकतो. आपल्याला राहण्याकरतां मोठालीं बिळें करण्याची संवय याला असते. याखेरीज पाणी मिळविण्याकरतां हा नदीच्या पात्रांत वाळू उकरतो व मोठाले खड्डे करतो. बिळांत लपणारे प्राणी पकडण्याकरतां याला उकरा-उकरी करणें अगत्याचें असतें. अशा उद्योगानें ताजें खाद्य न मिळालें तर हा प्रेतें उकरून खातो. उंदीर, घुशी, साप, सरडे, बेडूक, ससे, पक्षी यांपैकीं कांहीहि याला वर्ज्य नाहीं. यांखेरीज मधमाशांचीं पोवळीं उसकडून हा मधावर ताव मारतो आणि प्रसंगविशेषीं फळेंहि खातो.

याचा रंग मोठा चमत्कारिक असतो. वीझेल ( एरमाईन ) याचा रंग पाठीकडे दाट पिंगा आणि पोटाकडे पांढरा असतो. उंदीर, घुशी, ससे इत्यादिकांचाहि रंग पोटाकडे फिका आणि पाठीकडे दाट काळा पिंगा असला कसला तरी असतो; पण या बालरींचांचा रंग त्याच्या उलट असतो. तो पाठीकडे फिका आणि पोटाकडे दाट असतो. त्यामुळें त्यांची आकृति उठावदार दिसते. तो सहसा लपूं शकत नाहीं; आणि तशी त्या प्राण्याला लपण्याची आवश्यकताहि नसते. त्याचें कातडें चिवट असतें. त्यांत सहसा मोठ्या हिंस्रांचीं सुद्धां नखें सहज रोचलीं जात नाहींत. शिवाय हा पशु

गुदाभोंवतीं असणाऱ्या दुर्गंधाच्या ग्रंथींतून आयत्या वेळीं दुर्गंधाचा वर्षाव करूं शकतो. ही गोष्ट माहीत असलेला प्राणी त्याला पाहून अगोदरच त्यापासून दूर जातो. इतकेंहि करून एखादा नवखा मोठा हिंस्र दुर्गंधाला न जुमानत अंगावर आलाच तर हा मेल्याची बतावणी उत्तम रीतीनें करूं शकतो. लहान हिंस्रांना हा भीक घालीत नाहीं. अशा अनेकांशीं सुद्धां एकटा लढतो. यानें आत्मसंरक्षणार्थ माणसावर चाल केल्याचीं उदाहरणें घडलीं आहेत.

हिमालयाच्या पायथ्यापासून दक्षिणेस अति पावसाचीं रानें सोडून इतर सर्व रानांत हे प्राणी आढळतात.

### ६ मार्टेन ( Marten ). आ. ४१

या नांवाच्या प्राण्यांच्या अनेक जाती आहेत. त्यांतील एका जातीचें नांव **स्टोन मार्टेन** असें आहे. या जातीचे पशू काश्मिरांत आणि हिमालयाच्या पश्चिम व मध्य भागांत आढळतात. हे सहसा ६००० फुटांपेक्षां खालीं उतरत नाहींत. यांचें रूप कांहींसें मांजरासारखें आणि कांहींसें खारीसारखें असतें. तोंड मांजरापेक्षां चिंचोळें असतें, पाय मांजरापेक्षां जरा जाड असतात आणि शेपूट खारीसारखें पिंजारलेलें असतें. तें इतर अंगाच्या साधारणतः निम्में लांब असतें. आकार गांवठी मांजराएवढाच असतो. कान मांजराच्या सारखेच असतात. ते झाडाच्या ढोलींत किंवा दगडांच्या सापटींतहि राहतात. खारी, पक्षी, उंदीर, सरडे, बेडूक, साप हीं त्यांचीं खाद्यें होत. ते विशेषतः झाडावरच आपलें भक्ष्य मिळवूं पाहतात. त्यांचा झाडावर संचार सहज आणि चपलतेनें चालतो. भुईवरहि त्यांना चांगलें धावतां येतें. भुईवर धावतांना ते पाठीची कमान करतात. हिमालयांत वृक्ष नसलेल्या ठिकाणींहि यांची वसति आहे. तेथें ते शशुंदरांची मृगया करतात. यांनाहि दुर्गंधग्रंथी असतात. यांचा रंग पाठीकडे पिंगा आणि पोटाकडे फिका असतो. गळ्याखालीं रंग बहुधा पांढरा असतो.

निलगिरी, दक्षिण कूर्ग आणि त्रावणकोर या प्रदेशांत राहणारे कांहीं मार्टेन आहेत. त्यांचा रंग पाठीकडे दाट पिंगा, पोटाकडे फिका आणि गळ्याखालीं पिवळा असतो. पाय बहुतेक तांबडे असतात. असेच पण पाठीकडे विविध रंगांचे आणि गळ्यावर मात्र पिवळा रंग असलेले मार्टेन हिमालयांत आहेत. त्यांच्या गळ्याच्या दोनहि अंगांला पिवळ्या शेजारीं दोन दाट पिंग्या रंगाचे पट्टे असतात. यांना **पीतगल मार्टेन** म्हणावें. या प्राण्यांचें अंग मोठ्या मांजराएवढें असून शेपूट अंगाच्या दोनतृतीयांश लांब असतें. हे प्राणी उंचावर राहणारे आहेत. सहसा ३००० फुटांखालीं उतरत नाहींत. ते बहुधा झाडावरच वसति करतात. ते विवाहऋतूंत जोडीनें राहातात. पिलें झाल्यावर त्यांना मृगया शिकवून तयार करतात. नंतर एकएकटेच ते आपआपलीं राज्यें स्थापन करतात. आखून घेतलेल्या क्षेत्रांत इतर सजातीयांस फिरकूं देत नाहींत. उंदीर, घुशी, साप, पक्षी, यांची मृगया तर हे करतातच पण प्रसंगीं हरिणाच्या पाडसाची देखील मृगया करतात.

ते फळें व मधहि खातात. सावरीला फुलांचा भर येतो तेव्हां त्यांतील मध लुटण्याकरतां बरेच पक्षी येतात. त्या पक्ष्यांची मृगया न साधली तर हे मार्टेन पक्ष्याप्रमाणें आपणहि फुलांतला मध पितात ! यांच्याहि अंगीं दुर्गंधग्रंथी असतात.

**७ ओतु, पाणमांजर** ( **Smooth Indian Otter** ). आ. ४२

गांवठी मांजर किंवा रानमांजर आपण होऊन कधीं पाण्यांत उतरत नाहीं. रानमांजरांपैकीं एका जातीचें मांजर पाण्याच्या कांठाशीं बसून पाण्याच्या पृष्ठाशीं येणारे मासे थप्पडीसरशी बाहेर उडवून देऊन मग पकडतें, पण मासे धरण्याकरतां पाण्यांत उतरत नाहीं. कांहीं पशू आकारानें मांजरापेक्षां थोडे मोठे पण आकृतीनें बरेचसे मांजरासारखे असून हौशीनें पाण्यांत वावरणारे आहेत. त्यांना पाणमांजरें म्हणतात. वास्तविक मांजरापेक्षां त्यांचें

साम्य वीझेल व मार्टेन यांच्याशीं अधिक आहे. त्यांचे कान मांजरासारखे टोकदार आणि मोठाले नसतात तर गोलसर आणि बारीकसे असतात; त्यांच्या अंगावरचे केस सुळसुळीत असतात. ते पाणी शोषून घेत नाहींत. त्यांच्या मिशा ताठ राहतात, भिजतात तरी वाकत नाहींत. पाण्यांत दृष्टि चांगली चालत नाहीं तेव्हां या मिशांचा उपयोग स्पर्शज्ञानानें भक्ष्य ओळखण्याकरतां विशेष होतो. या पशूंच्या पंजांतहि पोहण्यायोग्य रचना आढळते. यांच्या बोटांमध्यें पाणपक्ष्यांच्या बोटांमध्यें असतात तसे पडदे असतात. पुढल्यापेक्षां मागले पाय अधिक मोठे आणि बळकट असतात. यांची शेपटी चांगली टोकदार असते. तोंड मांजरापेक्षां चिंचोळें असतें. एकंदरींत आकृति चार वल्हीं लावलेल्या नावेसारखी असते. तथापि नाव कडक असते. तिला वळणें देण्यास बरेच प्रयास पडतात; परंतु या पशूंचें शरीर अगदीं लिबलिबीत असतें. त्याला सहज वळणें देतां येतात. ओतूंच्या नाकाला झडपा असतात. त्यांतून पाणी बाहेर पडूं शकतें, परंतु आंत शिरूं शकत नाहीं. पाण्यांत डुबी मारली असतां नाक मुद्दाम मिटण्याची आवश्यकता नसते. पोहतांना नाक पाण्याच्या वर ठेवतात, तेव्हां श्वासोच्छ्वास सहज घडतो. यांचा रंग पिंगट असतो. आणि मिशांची वरची सीमा सरळ असते. अंग २५″ ते २९″ लांब, शेपूट १६″ ते १८″ लांब.

पाणमांजरें जलाशयाच्या कांठाला राहतात. बहुशः तीं मासे खाऊन राहतात, पण तळीं आटलीं म्हणजे भूमीवर संचार करून लहानसहान भूचर प्राण्यांना किंवा पक्ष्यांना मारून खातात. तीं बहुधा एकेकटींच हिंडतात; परंतु कधीं कधीं कुटुंबीय गट करून एकमेकांच्या साहाय्यानें भक्ष्य पकडतात. हे पशू हिमालयाच्या दक्षिणेस सर्व भारतांत आहेत.

**८ ओतु, पाणकुत्रा** ( **The Common Otter** ). आ. ४२

बहुशः पाणमांजरासारखा पण आकारानें थोडासा मोठा असा एक पशु भारताच्या थंड प्रदेशांत राहणारा आहे. त्याला पाणकुत्रा म्हणतात. त्याचीं

विशेष लक्षणें म्हटलीं म्हणजे त्याचा करडा रंग आणि भरडे केस हीं होत. याशिवाय बारकाईनें पाहिलें असतां हटकून आढळणारें लक्षण म्हणजे असें कीं त्याच्या मिशांची वरिष्ठ ओळ सरळ नसून कोचदार किंवा नागमोडी असते.

पाणकुत्रे बहुशः मासे खातात, पण प्रसंगीं इतर प्राणीहि मारून खातात. हे अतिशय हिंसाप्रिय आहेत. भूक भागली असतांना देखील केवळ हौशी-करतां हे बहुत मासे मारून टाकतात. यांची वसति काश्मीरपासून सर्व हिमालय प्रदेशांत आहे. याखेरीज हे दक्षिणेंतील उंच पर्वतावरहि आढळतात. सपाटीवर मात्र आढळत नाहींत.

## उपसंहार

वीझेल, मार्टेन आणि ओतू हे पशू आकारानें लहान खरे पण पराक्रमानें फार मोठे आहेत. यांच्याइतकी प्राण्यांची हत्या दुसरे कोणी करीत असतील कीं नाहीं शंकाच आहे. धान्य, झाडपाला आणि मुळेंफळें यांचा नाश करण्यांत उंदीर, घुशी, खारी इत्यादि कृन्तकांचा क्रमांक पहिला आहे. त्यांच्याच जोडीला कीटकांनाहि गणतां येईल. या सर्वांचा फडशा अगदीं निर्दयपणें करणारे पशू ओतू, मार्टेन आणि वीझेल हे होत. ओतूंचा सपाटा कृन्तकांपेक्षां मत्स्यांवर पुष्कळच अधिक असतो. तथापि मत्स्यांना कृन्तकां-पेक्षांहि विपुल संतति होत असून जलचरांमध्यें त्यांचा क्रमांकहि उद्भिद-नाशक म्हणून बराच वरचा आहे. तेव्हां एकंदरींत पाहतां कृन्तक आणि मत्स्य यांची संख्या आटोक्यांत ठेवणारे संहारकर्ते म्हणून सृष्टिव्यापारांत यांचें महत्त्व आहे, एवढें निर्विवाद आहे.

## प्रकरण सातवें

# मध्यम हिंस्र

वाघ, सिंह हे मोठे हिंस्र आणि चिचुंदर, वीझेल, रेटेल इ० प्राणी हे छोटे हिंस्र होत. अर्थात्च कुत्रे, कोल्हे, लांडगे, तरस, अस्वल हे मध्यम हिंस्र म्हटले पाहिजेत. या मध्यम हिंस्रांपैकीं अस्वल हें आकारानें मोठें असतें. पण हिंस्रपणांत त्याचा अनुक्रम शेवटचा लागतो. हिंस्रपणांत अस्वलापेक्षां कोल्हे देखील वरचढ आहेत. कोल्ह्यांपेक्षां लांडगे आणि लांडग्यांपेक्षां कुत्रे हिंस्रपणांत श्रेष्ठ आहेत. हे चारी पशू माणसाळूं शकतात. पण त्यांतल्या त्यांत कुत्र्यांना माणसांनीं आपल्या सहवासाचा विशेष मान दिला आहे. कुत्र्यांच्या खालोखाल अस्वल माणसाच्या आधीन राहून थोडीबहुत करमणुकीचीं कामें करूं शकतें. माणसाच्या आधीन राहून कुत्र्यांची एक स्वतंत्र पाळीव जातच निर्माण झाली आहे, इतकेंच नव्हे तर या जातींत अनेक पोटजातीहि निर्माण झाल्या आहेत. कुत्रा पाळीव झाल्याला इतका दीर्घ काळ लोटला आहे कीं कोणत्या वन्य जातीपासून पाळीव कुत्रे निपजले तें सांगणें मोठें कठिण झालें आहे. इतर मध्यम हिंस्रांच्या अशा पाळीव किंवा गांवठी (अवन्य) जाती निर्माण झालेल्या नाहींत.

**अस्वल**. आ. ४३, ४४, ४५

मोठें लांबट बोजड तोंड, केसाळ शरीर आणि अगदीं आखूड शेपूट हीं अस्वलाचीं प्रमुख लक्षणें होत. अस्वलाला ४२ दांत असतात. ते सर्व शाकाहाराच्या सोईचे असतात. मांसांत खुपसण्याचे सुळे किंवा मांस कातरण्याच्या दाढा यांचा त्यांत समावेश नसतो. सुळे असतात ते प्रखर नसतात आणि दाढा असतात त्या फळें, मुळें, पाला इत्यादि भरडण्याच्या किंवा चुरडण्याच्या सोईच्या असतात. पुढले कातरे दांतहि विशेष धारेचे नसतात. अस्वलाचीं पावलें आणि पंजे यांचें माणसाच्या पावलांशीं बरेंच

साम्य असतें. त्यांना पांच पांचच बोटें असतात. हिमांत राहणारीं अस्वलें आहेत त्यांच्या पावलांपंजांच्या तळव्याला देखील केस असतात. झाडावर चढणारीं अस्वलें आहेत. त्यांच्या तळव्याला केस नसतात. अस्वलांच्या पंजाच्या नखांना आंगठ्याच्या कडे वळण असतें. झाडावर चढतांना त्यास विळखा घालण्याकरतां तीं वळणें सोईचीं असतात. या वळणांमुळेंच अस्वल थप्पड मारतें तेव्हां तें आपल्या अंगाकडील दिशेसच मारूं शकतें. तें थपडीसरशीं दुसऱ्याला जवळ ओढतें. अस्वलें रूपानें बेडौल असलीं तरी बळकट आणि शूर असतात. तीं आपण होऊन कोण्या मोठ्या पशूच्या वाटेस जात नाहींत. परंतु त्यांच्या वाटेला कोणी गेलाच तर ते त्यास जोराची थप्पड लगावतात, आणि चावतातहि. विशेषतः कोणापासून पिलास भय आहे असें वाटल्यास तीं त्यावर तुटून पडतात. त्यांची दृष्टि तीक्ष्ण नसते आणि त्यांना चांगलें ऐकूंहि येत नाहीं. माणूस किंवा दुसरें कोणी जवळ येईल तेव्हांच त्यांची जाणीव व्हावयाची. म्हणून त्यांचा हल्ला नेहमीं आकस्मिक आणि जोरदार असतो.

अस्वल हा प्राणी म्हटला तर हिंस्र आहे, म्हटला तर अहिंस्रहि आहे. उंदीर, घुशी, ससे यांसारखे बिळांत राहणारे प्राणी किंवा त्याहून लहान कीड-किरडूं खाणें हा त्यांचा स्वभाव आहे; तरी तो कांहीं त्यांचा पोट-भरीचा आहार नाही. गवत, झाडपाला, फळें, मुळें, फुलें हाच त्यांचा प्रधान आहार आहे. अस्वलांना झाडावर चढतां येतें. कधीं कधीं फळां-फुलांकरतां ते झाडावर चढतात; पण बहुधा झाडावर चढण्यांत त्यांचा हेतु मधाचें पोवळें पाडण्याचा असतो. पोवळें पाडून ते त्यांतला मध पितात. अंगावर भुरपूर केस असल्यामुळें माशा चावण्याचें भय त्यांना नसतें. वड, पिंपळ, उंबर यांचीं फळें हा त्यांचा नित्याचा आहार असतो. याशिवाय त्याना ऋतुपरत्वें मोहडा, करंज, शेवगा, पळस, सावर, इत्यादि झाडांच्या फुलांच्या पाकळ्या किंवा सबंध फुलेंच खालीं पडतात तीं खावयास

सांपडतात. प्रसंगीं ते कंदमुळें उकरून खातात आणि त्याबरोबरच भूमींत सांपडणारे किडेहि खातात. झाडाच्या सालींतले किडे देखील ते उकरून खातात.

अस्वलें दाट जंगलांत राहतात. तेथें त्यांना त्यांच्या आहाराच्या वस्तू विपुल मिळतात; त्यांना दुपारच्या प्रहरीं छाया हवी असते ती मिळते. आणि आसऱ्याकरतां कपारी, गुहा, मोठालीं बिळें पाहिजे असतात तींहि मिळतात किंवा स्वतः करून घेतां येतात. अस्वलें ओसाड अरण्यांत रहात नाहींत आणि मनुष्यवस्तीच्या जवळपासहि रहात नाहींत. भारतांत तीन जातींचीं अस्वलें आहेत. त्यांपैकीं केवळ हिमालयांतच राहणाऱ्या दोन जाती आहेत. एकीला **रिंच** म्हणतात. त्यांचा रंग पिंगा असतो. रिंच नेहमीं उंचावरच राहतात. हिम पडलें म्हणजे ते आपल्या गुहेंत किंवा बिळांत जाऊन **हिमनिद्रा** घेतात. हिम वितळेपर्यंत निश्चेष्ट राहतात. मग आपल्या उद्योगाला लागतात. ही महानिद्रा घेण्यापूर्वीं ते भले लठ्ठ झालेले असतात. निद्रेंतून उठल्यावर लठ्ठच असतात. मग चळवळ करूं लागल्यावर कांहीं काळ रोडावत जातात, कारण या वेळीं भरपूर खटपट करूनहि खाद्य थोडकेंच मिळतें. पुढें पुढें भरपूर खाद्य थोड्या श्रमांत मिळतें तेव्हां ते लठ्ठ होतात कीं पुनः हिमकाळ येतो. दुसऱ्या जातीचीं हिमालयीन अस्वलें असतात त्यांना ऋक्ष ( रीस ) म्हणतात. त्यांचा रंग काळा असतो. पण त्यांच्या कंठाशीं एक मोठी पांढरी रोमन पांच आंकड्यामारखी V अशी खूण असते. रीस हिवाळ्यामध्यें हिमप्रदेशांतून खालच्या उतारावर येतात. ते हिमनिद्रा घेत नाहींत. त्यांचा भर मांसाहारावर इतर अस्वलांपेक्षां अधिक असतो. इतरत्र जंगलांत राहणाऱ्या अस्वलांची जात तिसरी. या जातीला भल्लू, भालु अशीं नांवें आहेत. या अस्वलांचा विशेष असा कीं, यांचे केस नेहमीं अगदीं उभे नव्हे, पण चांगले चापून बसलेलेहि नव्हेत, असे बरेच पिंजारलेले असतात. रंग बहुधा काळा असतो; क्वचित् पिंगा असतो. ऋक्ष

आणि रिंच यांचे केस भालूंच्या इतके पिंजारलेले नसतात. अस्वली केस म्हणजे पिंजारलेले केस, ही जी भाषा निघाली आहे ती या भालूंच्या केसांवरून.

भालू आकारानें सर्वांत लहान असतात. त्यांची लांबी सुमारें ५ फूट आणि उंची दोन फूट तीन इंच असते. रिंच सर्वांत मोठे असतात. कांहीं ८ फूट लांबीचे रिंच आढळले आहेत. ऋक्ष मध्यम असतात.

**पण्डा अस्वलीमांजर** ( **Cat Bear** ) आ. ४६

पंडा या नांवाचा एक हिंस्र पशु पूर्वहिमालयांत आढळतो. त्याचें रूप मांजरासारखें दिसतें पण कांहीं महत्त्वाच्या बाबतींत तें अस्वलासारखें असतें, आणि कांहीं बाबतींत आणखी निराळेंच असतें. अस्वलें हातां-पायांचे पंजे टेकून चालतात तसे पंडेहि तळवे टेकून चालतात. त्यांना गुदाभोंवतीं दुर्गंधि स्रवणारी ग्रंथि असते. मधून मधून बसल्याजागीं ते हा भाग घासतात तेव्हां ही घाण त्या जागीं लागते. रानांत असतांना एकमेकांचा माग काढण्यास या दुर्गंधीचा उपयोग होत असावा, असा तर्क आहे.

पंडाचें अंग साधारणतः नारिंगी रंगाचें असून डोळ्याशेजारीं थोडा तांबडा पट्टा असतो. ओठ पांढरे असतात. पाय आखूड आणि तोंड रुंदट असतें. लांबी २ फूट आणि शेपूट १६ इंच लांब असतें. हे पशु सहज माणसाळतात.

यांचें खाणें विविध असतें. गवत, फळें, फुलें, तसेंच कीड-किरडूंहि यांना आवडतें.

अस्वलें आणि पंडा एकएकटेच राहतात. पिलें मात्र प्रौढ होईपर्यंत आईजवळ राहतात.

**कोल्हा.** आ. ४७, ५१

साधारण कुत्र्यासारखा पण विशेषतः निमुळतें तोंड, उभे कान आणि झुपकेदार शेपूट असलेला हा प्राणी लबाडीचें प्रतीक म्हणून सर्वांना माहीत

आहे. यांच्यांत बहुत जाती आहेत. निदान तीन तरी चांगल्या स्पष्ट आहेत. **शृगाल, जंबूक** आणि **क्रोष्टु** असे तीन संस्कृत शब्द प्रसिद्ध आहेत. तिघांचेंहि भाषांतर आपण कोल्हा असेंच करतों. तथापि एकेका जातीला एकेक नांव देणें हेंच इष्ट आहे. या तीन जातींतील भेद विशेष ठळक नाहींत. शास्त्रज्ञांनीं त्यांच्या तोंडाच्या हाडांच्या घाटावरून त्यांचे भेद केलेले आहेत. हा भेद जिवंतपणीं पाहण्याजोगा नाहीं. दुसरा भेद डोळ्यांतील बाहुलीच्या आकृतीचा. एका जातींत बाहुली आकरसली असतां वाटोळीची वाटोळीच राहते. दुसऱ्या जातींत ती आकरसली असतां वाटोळीची लांबट होते. हा भेद देखील जिवंतपणीं दिसण्याजोगा असला तरी फार जवळ जाऊन पाहावा लागतो; दुरून समजत नाहीं. ज्याची बाहुली वाटोळीच राहते तो शृगाल, शियाल, Jackal; आणि ज्याची लांबट होते तो जंबूक किंवा क्रोष्टु Fox होय. जंबूकाचा रंग तांबूस असतो. इतरांचा तसा नसतो. जंबूक हिमालय प्रदेशांत अरण्यांत राहतो; इतरत्र आढळत नाहीं. तो विशेष केसाळ असतो, शृगाल आणि क्रोष्टु हेच इतरत्र आढळणारे आहेत. यांनाच बहुधा अनुक्रमें **खोकड** आणि कोल्हा असें म्हणतात. खोकडापेक्षां कोल्हे अंगानें लहान असून त्यांची शेपटी मात्र अधिक लांब असते.

कोल्ह्यांच्या बुद्धिमत्तेच्या अथवा लबाडीच्या पुष्कळ गोष्टी प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं एका गोष्टीचें प्रत्यंतर वारंवार येतें. कोल्ह्याला जेव्हां माशांपासून अतिशय त्रास होतो तेव्हां तो तोंडांत एक काठी धरून पाण्यांत उतरतो. त्याच्या अंगावरच्या माशा प्रथम त्याच्या तोंडावर जमतात. मग तो आपलें तोंडहि पाण्यांत बुडवितो. मग त्या काठीवर सर्व माशा जमतात. असें झालें कीं तो काठी पाण्यांतच सोडून देऊन पाण्यांतून बाहेर निघून सूं बाल्या करतो ! खोकडें असें करीत नाहींत.

कोल्हा शाकाहारी आणि मांसाहारीहि आहे. त्याच्या अंगीं बळ नाहीं आणि शौर्यहि नाहीं; धूर्तपणा मात्र आहे. त्याला महिषांचें मांस आवडतें

पण महिष मारतां येत नाहीं. वाघ महिष मारतात त्यांच्यावर हा पाळद ठेवून त्यांतलें उरलेंसुरलें खातो. संकटांत सांपडला असतां हुलकावण्या देणें, वेळीं मेल्याचें ढोंग करणें, यांत हा तरबेज असतो. हा बिळें करून राहणारा आहे. याच्या बिळाला पळवाटा असतात. उंदीर, घुशी, ससे, खेकडे, उंबरें, जांभळें, बोरें हें याचें नित्याचें खाद्य आहे.

## वृक, लांडगा. आ. ४८

कोल्ह्यापेक्षां लांडगा आकारानें मोठा, आकृतीनें अधिक उंचट, अधिक जाड आणि स्वभावानें केवळ धीटच नव्हे तर क्रूरहि असतो. त्याची उंची दोन अडीच फूट असून लांबी तीन साडेतीन फूट असते. शेपूट १४, १६ इंच असतें. लांडगे जंगलांत तसेच अरण्यांत उंचावर तसे सखलावरहि आढळतात. जंगली वृकांचा रंग दाट पिंगा असून त्यांत काळसर पट्टे असतात. अरण्य-वृकांचा रंग अमळ फिका असतो. हिमालयीन वृक काळेहि असतात. वृकांना उन्हाचा तडाखा सोसत नाही. उन्हाच्या वेळीं ते बिळांत किंवा झाडाझुडांच्या सावलीत राहतात.

लांडगे जोडप्यांनी राहतात. लांडग्यांची वीण बिळांत होते. पिलांच्या रक्षणाचें काम आईबाप करतात. नुकती व्यालेली लांडगी आपल्या बिळाच्या आसपास कोणा परक्याला येऊं देत नाहीं. मोठें भय प्राप्त झालें आहे असें वाटल्यास ती पिलांचें स्थलांतर करते.

ससे, घुशी, उंदीर हें लांडग्यांचें नित्य खाद्य आहे. याखेरीज पक्षी, कोकरें, बकरें, हरिण यांना ते मारून खातात. जोडीजोडीनें रहात असल्यामुळें त्यांना सांबरेंहि मारतां येणें शक्य असतें. अशी मृगया ते कधीं कधीं करतात. भक्ष्य दुर्मिळ झालें म्हणजे मोठमोठ्या टोळ्या करून मोठ्या प्राण्याची मृगया करण्यास ते सज्ज होतात. अशा टोळ्या रूस देशांत आढळतात; भारतांत आढळत नाहीत.

भक्ष्य मिळविण्याकरितां लांडगे मनुष्यवस्तींत घुसतात. प्रसंगीं ते माणसावरहि झडप घालतात. लांडग्यांनीं मुलें पळवून नेल्याचीं उदाहरणें घडलीं आहेत. लांडग्यापासून माणसांना भीति असते म्हणून माणूस त्याला आपल्या वसतीपासून दूर हुसकावून लावतो. त्यामुळें लांडग्यालाहि माणसांचें भय वाटतें आणि तो मनुष्यवस्तीजवळ रहात नाहीं. म्हणून मनुष्यवस्तीच्या विस्ताराबरोबर लांडग्यांची वसति हटत चालली आहे.

लांडगा शूर, क्रूर आणि आधाशीहि आहे असें म्हणतात. पण तो खरोखरी आधाशी नाहीं; क्रूर मात्र आहे. एकदा मृगयेची धुंदी आली म्हणजे भुकेला पाहिजे त्यापेक्षां पुष्कळ अधिक प्राण्यांची हत्या करण्यास तो कमी करीत नाहींत. अशी हत्या केल्यावर शिल्लक राहील त्या मांसावर कोल्हे, तरस, घारी, गिधाडें यांची पोळी पिकते !

## तरस. आ. ४९

हा प्राणी हिंस्र खरा पण बारगळलेला हिंस्र आहे. हा केव्हां केव्हां आपल्याहून लहान पशूंना मारून त्यांचें मांस खातो. पण त्याची नेहमींची वृत्ति मारून खाण्याची नाहीं; मेलेलें खाण्याची आहे. रोगानें किंवा अपघातानें मेलेले पशू किंवा दुसऱ्या एखाद्या हिंस्रानें मारलेला पशु सांपडला म्हणजे त्याचें शव फाडून खावें, हा या पशूचा स्वभाव आहे. अशा आयत्या शवावर अर्थातच कोल्ह्यासारख्या इतर पशूंचा आणि गिधाडासारख्या पक्ष्यांचा डोळा असतोच. तेव्हां असें खाद्य तरसाला ताजें मिळणें दुरापास्तच. तें शिळें किंवा दुसऱ्यानें अर्धवट टाकून दिलेलें असावयाचें. त्यांत मुख्य खाद्य म्हणजे हाडें आणि त्यांना चिकटून राहणारें मांस. हाडांच्या आंत मज्जा या नांवाचें ओषट असतें तें या प्राण्याला भरपूर मिळतें.

तरसाचा जबडा भला मोठा असतो. त्यांत हाडें फोडण्याच्या योग्यतेच्या दाढा असतात. मांसांत रोचण्यास उपयोगी पडणारे सुळे विशेष मोठे

नसतात. तरसाचे कान उभारलेले आणि टोकदार असून त्यांच्यापासून लांबट उभारलेल्या केसांच्या रांगा सुरू होतात. त्या मागें शेपटापर्यंत पोंचतात. या पशूची लांबी ५ फूट आणि उंची ३ फूट असते. तरसाच्या पायांचीं बोटें तीक्ष्ण नसतात आणि तीं त्याला झांकूनहि घेतां येत नाहींत. तरसाचा रंग पिंगट असून त्यांत थोडेसे लांबट काळसर पट्टे असतात.

तरस रात्रिसंचारी आहेत. दिवसाउजेडीं ते एखाद्या बिळांत किंवा कपारींत लपून बसतात. बहुधा ते एकटेच हिंडत असतात. मादीबरोबर एखाद्या वेताचीं पिलें असतात. एखाद्या शवावर धाड घातली असतां त्यांना वाघाशीं किंवा बिबळ्याशीं झगडण्याचा प्रसंग येतो तेव्हां ते शौर्यानें लढतात. पण केव्हां केव्हां त्यांना कुत्र्यांपुढेंहि माघार घ्यावी लागते. कारण रानकुत्रे टोळी करून शत्रूवर चाल करतात. गांवकुत्री मात्र तरसापुढें टिकाव धरूं शकत नाहींत. लोणावळा-खंडाळ्याच्या आसपास गांवठी कुत्रीं पळवून नेणें हा तरसांचा धंदाच होऊन बसलेला आहे. कोकरें, वासरें, कोंबडीं असल्या प्राण्यांची हत्या तरस सहज करतात. तरसांनीं माणसावर चाल केल्याचीं उदाहरणें घडलीं आहेत.

### रानकुत्रा, सोन, श्वान. आ. ५०, ५१

रानकुत्र्याला हिंदींत सोन म्हणतात. संस्कृत श्वान या शब्दापासून सोन हा शब्द झाला हें उघड आहे. हे श्वान पुष्कळसे कोल्ह्यासारखे दिसतात तरी ते रंगानें अधिक तांबडे असतात आणि स्वभावानें फारच भिन्न असतात. कोल्हे लबाड आणि भित्रे असतात, तर सोन धीट आणि शूर असतात. सोन मनुष्यवस्तींत तर नाहींच, पण मनुष्यवस्तीच्या शेजारीं देखील रहात नाहींत; ते जंगलांत राहतात. पिलें ठेवण्याकरतां ते बिळें तयार करतात. सोन पूर्णपणें मांसाहारी आहेत. ते अगदीं क्वचित् फळें खातात. हिवाळ्यांत त्यांच्या जोड्या जोड्या जमतात. या वेळीं ते जोडीजोडीनेंच शिकार करतात. ससे व लहानशीं हरणें हीं त्यांच्या तावडींत सहज सांपडतात. कांहीं

दिवसांनीं कुटुंब तयार होऊन सबंध कुटुंब मृगयेकरतां सिद्ध होतें. तेव्हां ते अंमळ मोठीं हरिणें किंवा सांबरांचीं पिलें पकडतात. हरणांच्या कळपावर श्वानांची धाड आली म्हणजे त्यांची दाणादाण होते. त्यांतील पिलें सहज बळी पडतात. भर उन्हाळ्यांत अनेक श्वान-कुटुंबें मिळून एक मोठी टोळी किंवा सेनाच तयार होते. अशा सेना मग मोठाल्या सांबरांचीहि मृगया करतात. सांबराला श्वान चारी दिशांनीं घेरतात आणि मग मृगाचा कोंडमारा झाला म्हणजे कोणी तोंडावर तर कोणी कुशींत तर कोणी टाचेस तर कोणी कांसेस किंवा वृषणास डासा घेतो. श्वानानें दंश केला म्हणजे तो दष्ट भाग फोडल्याखेरीज पकड सोडीत नाहीं. अशा मृगयेमध्यें बिबळ्या किंवा वाघ यांशींहि श्वानांची गांठ पडते, तेव्हां ते मोठ्या हिंस्रांना देखील मारल्याखेरीज रहात नाहींत. गवय आणि महिष यांचीहि मृगया श्वानसेना करते. श्वानांच्या भीतीनें हरिणें रान सोडून जातात तेव्हां त्यांच्या मागोमाग श्वानांनाहि वनान्तर करावें लागतें, कारण त्यांची हरिणमांसाची तहान लहान लहान प्राण्यांनीं भागत नाहीं.

श्वानांच्या शरीराची रचना मृगयेच्याच योग्यतेची असते. त्यांचे दांत मांसाशनाला योग्य असेच असतात. सुळे टोकदार असतात, दाढांना मांस कापण्यायोग्य धारा असतात. अवघ्राण ( नाक ), श्रोत्र ( कान ), नेत्र ( डोळे ) सर्वांना तीक्ष्ण संवेदन असतें. पाय आखूड असले तरी मांसपेशी बळकट असून मोठ्या उड्या मारण्यास समर्थ असतात. कटि बारीक असते, छातीचा कोठा मोठा असतो, एकंदर शरीर दमदार असतें. श्वानांचीं नखें बोथट असतात. त्यांना झाडावर चढतां येत नाहीं.

## गांवठी कुत्रें

गांवठी कुत्रीं विविध प्रकारचीं असतात. वीतभर उंचीचे कुत्रे आहेत तसे कंबरेइतक्या उंचीचेहि आहेत. चिंचोळ्या लांबट तोंडाचे आहेत आणि आखूड रुंदट तोंडाचे आहेत. शुभ्र पांढऱ्या रंगाचे आहेत, करड्या रंगाचे

आहेत, पिंग्या रंगाचे आहेत, ठिक्कर काळ्या रंगाचे आहेत आणि मिश्र रंगाचेहि आहेत. आखूड केसांचे आहेत आणि लांब केसांचेहि आहेत. नाजूक आहेत आणि कणखरहि आहेत. एस्किमो कुत्रे औत देखील ओढतात. इतकी विविधता असली तरी सर्वांची आहारविहारादिकांची रीत एकच असते. सर्व कुत्रे इमानी असतात, आपल्या मालकाला ओळखतात आणि त्याच्यावर जिवलगाप्रमाणें निष्ठा ठेवतात. सर्व पाळीव कुत्रे एकाच वन्य जातीपासून निर्माण झाले असावे असें कांहीं तज्ज्ञांचें मत आहे; परंतु कांहींच्या मतें त्यांच्यांत कोल्हा आणि लांडगा या जातींचें मिश्रण झालें आहे. गांवठी कुत्रे आणि कोल्हे-लांडगे यांची सोयरीक सफल होते एवढी गोष्ट खरी आहे. गांवठी कुत्र्याप्रमाणें कोल्हे माणसाळूं शकतात आणि तसें झालें म्हणजे कुत्र्याप्रमाणेंच ते आपले मनोभाव मुद्रेनें आणि अंगविक्षेपानें विशेषतः लांगूलचालनानें व्यक्त करतात. गांवठी कुत्रे बसण्यापूर्वी जेथल्या तेथें एखादी घिरटी घालतात. ही संवय लांडग्यांतहि आढळते.

## उपसंहार

सर्व हिंस्त्र पशूंमध्यें श्वानाइतका कोणताच पशु माणसाच्या उपयोगी पडला नाहीं; तथापि ' अति तेथें माती ' या न्यायानें श्वानाच्या मानवनिष्ठेची मातीच झालेली आढळते. कुत्रा हें निष्ठेचें प्रतीक न होतां लाचारीचें प्रतीक झालें आहे. कुत्र्याहून कमी शूर आणि बुद्धिमंद अस्वलाचें गौरव झालेलें आहे. त्यास ध्वजावर बसण्याचा मान मिळाला आहे. वाहन किंवा ध्वजचिन्ह होण्याचा मान श्वानाला मिळाला नाहीं. दत्तदेवाच्या परिवारांत मात्र त्यास लहानसें स्थान मिळालेलें आहे.

---

## प्रकरण आठवें

# वाघाची मावशी आणि मामा

वाघ हा केवढा मोठा पशु ! त्याचें नांव ऐकलें कीं साधारण माणसाला भीतीच वाटते. तो नुसता पराक्रमी आहे असें नव्हे तर क्रूरहि आहे. दुसऱ्या लहान मोठ्या प्राण्याची हत्या करूनच तो आपली जीविका चालवतो. सिंहाला पशूंचा राजा म्हणतात कारण तो सर्वांत शूर आहे. पण हें म्हणणें कांहीं निरपवाद नाहीं. पुष्कळ प्रसंगीं वाघ त्याची बरोबरी करूं शकतो किंवा त्याच्यावर मात करूं शकतो. अशा या वाघोबाची मावशी कोण ? तर म्हणे आमच्या घरांतली मनी मांजरी ! एकूण मांजरी वाघिणीची बहीण झाली तर. हो. धाकटी बहीण, पराक्रमानें जरा लहान बहीण अशी ती शोभते खरी. मांजरी स्वभावानें वाघिणीसारखी असते यांत शंका नाहीं. वाघीण हरिण, बैल, रेडा अशा मोठ्या पशूंना मारते तशी मांजरी मारीत नाहीं हा कांहीं स्वभावांतला खरा फरक नाहीं. मांजरीचें शरीर लहान म्हणून ती लहान शिकार करते, इतकेंच काय तें. दोनहि पशू हिंस्रच. दोघांची ठेवण सारखीच. दोघांची शिकारीची रीत देखील सारखीच. लपत लपत चोरट्या पावलांनीं सावजाजवळ जाऊन त्याजवर एकाएकीं घाला घालावयाचा हाच दोघांचा स्वभाव.

## रानमांजरें

मनुष्यवस्तींत चरितार्थ चालवणारीं मांजरें तीं गावठी मांजरें आणि वनांत चरितार्थ चालवणारीं मांजरें तीं वन्य मांजरें किंवा रानमांजरें होत. तीं अनेक जातींचीं आहेत. तीं अर्थातच गांवठी मांजरांपेक्षां अधिक क्रूर आहेत. गांवठी माजरें भातभाकरी खातात तशीं रानमांजरें कांहीं भात-भाकरी खात नाहींत. त्यांना अन्न शिजवून कोण देणार ! त्यांना फळें किंवा झाडपाला मिळूं शकेल; पण तीं असला आहार करीत नाहींत. तीं

केवळ मांसाहारीच असतात. उंदीर, ससे आणि पक्षी हे त्यांचे आहाराचे पदार्थ होत. जमिनीवर आणि झाडावर अशा दोनहि ठिकाणीं त्यांचा संचार असतो. रात्र किंवा दिवस कांहींच त्यांच्या संचाराला वर्ज नसतें. कुत्र्यांच्या टोळ्या असतात, पण मांजरांच्या टोळ्या नसतात. वाघ-सिंहांचीं कुटुंबें असतात. तशीं मांजरांचीं कुटुंबें नसतात. मांजरी एकटीच राहून आपल्या पिलांना संभाळते आणि शिकार शिकवून सोडून देते.

### जांगल मांजर Jungle Cat. आरण्य मांजर Desert Cat

जंगली मांजराचें मुख्य शरीर चांगलें हात दीड हात लांब असून शेपूट त्याच्या निम्मी असते. शेपूट अमळ आखूड असली तरी याचे पाय मात्र उंचट असतात. अंगाचा रंग सपक करडा किंवा पिवळसर असून पोट आणि कुशी यांजवर पुसट आणि तुटक पट्टे असतात. शेपटीचें टोक काळें असून त्याच्यामागें काळसर कडीं असतात. कानाचीं टोकें काळीं असतात. हें मांजर फार दाट झाडींत जात नाहीं. साधारण गवती रानांत किंवा ओसाडींत देखील राहतें. मनुष्यवस्तीशेजारीं आलें म्हणजे तें कोंबड्या-बदकांवर छापा घालतें. अशा प्रसंगीं तें माणसास भीत नाहीं. आरण्य मांजराचा आकार जांगल मांजराएवढाच असतो, पण त्याच्या अंगावर पुष्कळ काळे ठिपके असतात. छाती, गळा आणि हनुवटी यांवर ठिपके नसतात; हे भाग पांढरेच असतात. इतरत्र ठिपक्याभोंवतीं रंग करडा किंवा पिवळसर असतो. शेपटीचें टोक आणि कानाचीं टोकें काळीं असतात. हीं मांजरें ओसाड प्रांतांतच राहातात.

### बिडाल, वागटी, चित्ताबिल्ली Leopard Cat

या मांजराचें मुख्यांग जांगली मांजरापेक्षां अमळ लहान असतें. त्याचा रंग वेगवेगळा असूं शकतो पण कोणताहि असला तरी त्यास पिंगट किंवा काळसर ठिपके किंवा पट्टे असतात. पट्टे असतात ते पाठकण्यासरसे असतात. हीं मांजरें भारतांत सर्वत्र आढळतात. हीं दिवसा बहुशः कोठें

तरी लपून राहतात आणि रात्रीं शिकारीकरतां हिंडतात. हीं झाडाच्या ढोलींत रहात असल्याचें अनेकवार आढळलें आहे. यांचीं पिलें चांगलीं माणसाळतात. एकदा माणसाळल्यावर हाकलून दिलीं तरी तीं माणसाचा आसरा सोडीत नाहींत. असलें एक पाळीव मांजर इतर गांवठी मांजरांनीं हुसकावून दिल्यावर सुद्धां पुनः पुनः आपल्या धन्याकडे येई असें अनुभवास आलें आहे. या मांजराची सोयरीक गांवठी मांजरीशीं घडते याच कारणानें त्यांना गांवठी बोके हुसकावीत असावे. गांवठी बोक्यांना सजातीयांचाहि सहवास सहन होत नाहीं. ते एकमेकांशीं अगदीं प्राणांतिक युद्धें करतात. मग ते या परजातीयास कसे राहूं देतील ?

**शबल मांजर** ( Marbled Cat ). आ. ५२

या मांजराचा आकार गांवठी मांजराएवढाच असतो. मुख्यांग आणि शेपूट यांची लांबी सारखीच असते. गांवठी मांजरापेक्षां याचें कपाळ अधिक रुंद असून तोंडवळा अधिक गोलसर असतो. या मांजराच्या अंगावर तांबुस किंवा काळसर वेड्यावाकड्या रेषा असतात त्यावरून त्याला शबल असें नांव दिलें आहे. दाट पालवी असलेल्या वेलीखालीं किंवा वृक्षाखालीं छाया पडली असतां जसा देखावा दिसतो तसा याच्या अंगाचा देखावा दिसतो. अशा काळ्या पांढऱ्या रेषांच्या देखाव्यास शबल म्हणतात. हें मांजर झाडावरच राहणारें आहे. त्याच्या या शबल रंगामुळें तें झाडींत सहसा ओळखून येत नाहीं. याची वसति नेपाळ, सिकीम व आसाम येथील वनांत असते. हें भारतांत अन्यत्र आढळत नाहीं. ब्रह्मदेश व मलाया येथील वनांत आहे.

**सोनमांजर** ( Golden Cat ). आ. ५३

हें मांजर सर्व मांजरांत मोठें असतें. त्याचें मुख्यांगच चांगलें दीड हात लांब असतें. त्याशिवाय हातभर शेंपूट असते. याला सोनेरी म्हणतात कारण

यांपैकी पुष्कळांचा रंग तसा असतो.* पण कांहींचा रंग विटकरी, पिंगा, किंबा करडा असतो. या जातीचीं काळीं मांजरेंहि पाहण्यांत आहेत. यांच्या अंगावर पट्टे किंवा ठिपके फार कमी असतात. तोंडावर मात्र नेमानें दोन दोन पट्टे आढळतात. एक पट्टा डोळ्यापासून जिवणीपर्यंत असतो आणि दुसरा डोळ्याच्याच जवळ पण शरीरमध्याकडे असून वर डोक्यावर गेलेला असतो.

हीं मांजरें नेपाळ, सिक्कीम, आसाम या प्रांतांत आहेत तशीं तीं दक्षिणपूर्व आशियांतहि आहेत. ब्रह्मदेशांत या मांजराला 'शूर मांजर' असें म्हणतात. तें वाघापेक्षांहि शूर असतें असें सांगतात. पण तें कुत्र्याला भिऊन झाडावर पळून गेल्याचें पाहण्यांत आहे. या मांजराचीं शूरकृत्येंहि पाहण्यांत आहेत, नाहींत असें नाहीं. शेळया, मेंढ्या, हरिणें आणि गाईम्हशींचीं वासरें, पारडें या मांजरानें मारलेलीं पाहण्यांत आहेत.

महाभारतांत दुर्योधनानें धर्माला हिणवण्याकरतां एक भोंदू माजराची गोष्ट सांगितली आहे. त्या गोष्टींत मांजराचें वर्णन असें आहे:—

ततः स पापो दुष्टात्मा मूषिकानथ भक्षयन् ।
पीवरश्च **सुवर्णश्च** दृढबंधश्च जायते ॥ उद्योगपर्व, उलूकयान १५७

## धीवर मांजर ( Fishing Cat ). आ. ५४

या मांजराचें मुख्यांग सोनमांजराएवढेंच असतें पण त्याची शेपूट मात्र बरीच आखूड असते. हें मांजर जाडजूड व ठेंगणें असतें. सर्व मांजरांना आपलीं नखें मागें ओढून घेतां येतात. अशीं ओढून घेतलीं म्हणजे तीं त्यांच्या त्यांच्या ढापणाखालीं लपतात. या मांजराचीं हीं नखाचीं ढापणें तोकडीं असतात. त्यामुळें मागें घेऊनहि तीं पूर्णपणें झाकलीं जात नाहींत. या मांजराच्या पुढल्या पंजाच्या बोटांमध्यें लहानगे पडदे असतात. त्यावरून

* सुवर्ण ( सोनें ) या शब्दाचा मूळ अर्थ चांगला रंग इतकाच आहे.

हें मांजर पाण्यांत पोहत असावें असें वाटतें. पण तसें कधीं दिसून आलेलें नाहीं. याच्या अंगावर पट्टे व ठिपके असतात.

हें मांजर पुष्कळ वेळां मासे खातांना आढळतें, पण तें मासे पकण्या-करतां पाण्यांत उतरत नाहीं. तळ्याच्या किंवा डबक्याच्या किंवा ओहोळीच्या कांठाशीं बसून जवळपास दिसलेला मासा पंजाच्या थपडीसारशी बाहेर उडवून देतें ! धीवर म्हटलें म्हणून हें मांजर केवळ मासे खाऊन राहतें असें मात्र नाहीं. त्याला पशु-पक्षी-माणूस कांहीहि वर्ज नाहीं. या मांजरानें वांसरें, कोकरें, कुत्रीं आणि मुलेंहि पळवून नेल्याचीं उदाहरणें घडलीं आहेत. सर्वांत विलक्षण उदाहरण घडलें आहे तें असें. एका संग्रहालयांत एकाच पिंजऱ्यांत धीवर मांजर आणि बिबळी अशीं दोन जनावरें ठेवलेलीं होतीं. मध्यंतरीं एक पडदा होता. तो पडदा फाडून टाकून मांजरानें बिबळीचा जीव घेतला ! मांजर नुकतेंच रानांतून पकडून आणलें होतें.

**कराकल** ( Caracal ). आ. ५५

या नांवाचें एक भलें मोठें मांजर असतें. आकार साधारण धीवर मांजराच्या एवढाच असतो पण शेपूट मात्र केवळ वीतभरच असतें. या मांजराचे कान उभे, त्रिकोणी आणि टोंकदार असतात. हीं टोंकें बरींच लांब असतात. त्यावरून त्याची ओळखण चट्दिशी होते. हीं मांजरें कच्छ, काठेवाड, सिंध इत्यादि प्रांतांतील ओसाडींत राहणारीं आहेत. यांची संख्या झपाट्यानें घटत चालली आहे, असें म्हणतात. हीं मांजरें पाळलीं असतां चांगलीं माणसाळतात. तीं उत्तम शिकार करण्यास शिकतात. हरिणें, ससे, कोल्हे आणि लहानमोठे पक्षी, यांची शिकार या मांजरांना फार चांगली साधते.

**ऊर्द, ऊद, ऊदमांजर** ( Civet )

वाघाचा मूळचा देश उत्तर आशिया. तेथून तो पूर्वद्वारांतून भारतांत आला. वाघाची मावशी युरोपांतली. ती पश्चिम द्वारांतून भारतांत आली.

पण वाघ आणि त्याची मावशी यांपैकीं कोणीच येथें नव्हतें तेव्हां ऊद किंवा ऊदमांजरें येथें होतीं. इतिहासपूर्व काळचे जे अवशेष सांपडतात त्यांत यांचीं हाडें सांपडतात. पण त्यांस मांजरांचीं किंवा वाघांचीं सांपडत नाहींत. येथें ऊदाच्या जितक्या जाती सांपडतात तितक्या मांजरांच्या सांपडत नाहींत. ऊद हें खरोखरी मांजर नव्हेच. त्याच्यांत कांहीं गुण मांजराचे आहेत म्हणून त्याला ऊदमांजर म्हणतात इतकेंच. ऊदाचें तोंड मांजरापेक्षां लांबट असतें, पाय ठेंगणे असतात आणि केस भरड व लांब असतात. या बाबतींत त्याचें साम्य मांजरापेक्षां मुंगसाशीं अधिक असतें.

मांजराप्रमाणें ऊद पाळलें असतां माणसाळतें. परंतु तें रात्रिंचर असल्यामुळें फार करून त्याला कोणी पाळीत नाहीं. पाळीव असो वा नसो, मांजरापेक्षां ऊद स्वभावानें गरीब असतें. परिचय नसल्यामुळेंच माणूस त्याला मांजरापेक्षां अधिक भितो. सील्ड म्हणून एका जातीचें ऊद आहे तें सोडून सर्व ऊदांना गुदद्वाराच्या भोंवतीं गंधग्रंथी असतात. ऊद स्वतः भ्यालें म्हणजे त्याच्या या ग्रंथींतून स्राव बाहेर पडतो. तो अतिशय उग्र असतो. त्याच्या उग्रपणामुळें त्यांचे शत्रू तेथून निघून जातात. पण माणूस याच उग्र स्रावास कस्तुरी म्हणतो आणि ती कस्तुरी इतर पदार्थांत मिसळून तिचा सुगंध म्हणून उपयोग करून घेतो. उग्र गंधच पातळ किंवा विरळ केल्यानें सुखावह होतो. म्हैसुरी लोक या सुगंधाकरितां ऊद पाळतात. लाकडाच्या शलाकेनें सुगंधी स्राव कोरून काढतां येतो. अशी कोरणी आठ दिवसांनीं एकदां करतात.

मांजराप्रमाणेंच ऊद उंदीर, घुशी, ससे किंवा पक्षी यांची शिकार करतात. चोरट्या पावलांनीं जवळ जाऊन झडप मारणें अशीच त्यांची रीत असते. रानमांजरें शाकाहार करीत नाहींत पण रानटी ऊद शाकाहार करतात. त्यांना मांसाहाराच्या सोईचे सुळे आणि दाढा असून त्यांच्या जोडीला आणखी शाकाहाराच्या सोईच्या दाढाहि असतात. याकरतांच त्यांच्या तोंडाची ठेवण लांबट झाली आहे असें म्हटलें तरी चालेल.

**मध्यम ऊद (Common Palm-Civet or Toddycat).** आ. ५६

ऊदमांजराच्या तीन जाती प्रमुख आहेत. त्यांतली ही आकारानें मध्यम आहे. या प्राण्यांचें मध्यांग दोन फूट लांब असून शेपूटहि तितकीच लांब असते. याचा रंग काळा किंवा काळसर उदी असा असतो. हे ऊद रानांत राहतात किंवा मनुष्यवस्तींतहि राहतात. घरांत माळा किंवा दुसरी एखादी अडगळीची जागा असेल तेथें हे आपलें ठाण मांडतात. रात्रीच्या वेळीं सर्व घर धुंडाळतात व छपरावर धडाधड धांवतात. विशेषतः त्यांच्या विवाहऋतूंत ही गडबड फार चालते. घरांतिल उंदीर-घुशींचा नायनाट करून ते राहते तर त्यांचे उपकार सर्वांनीं चिरकाल स्मरले असते, पण एवढ्यानें त्यांचें समाधान होत नाहीं. ते माणसाची शिधासामग्री खातात, इतकेंच नव्हे तर खातात त्यापेक्षां अधिक नासून टाकतात. एका विद्यालयाच्या प्रयोगशाळेच्या कोठारांत या प्राण्यांनीं एकदा फार धुमाकूळ माजविला होता. रोज रसायनांच्या बाटल्या आणि इतर उपकरणीं उसकटलीं जात, कित्येक फुटत, सांडलवंड फार होई. एका दिवशीं दुपारींच प्रयोगशाळेंतील काम चाललें असतांनाच एक मोठा आवाज झाला. पाहिलें तों वायुभरणीच्या तारा तुटून त्यांना अडकवलेलीं प्रचंड वजनें खाली पडलीं होतीं. त्यांवर दोन ऊदमांजरांचीं पिलें बसलीं होतीं. वजनें उचलून घेतां त्यांच्या खालीं दोन पिलें चिरडलेलीं आढळलीं. ऊदीनें आपलीं पिलें ठेवण्याकरतां ही अंधार-कोठडी निवडलेली होती.

या प्राण्यांचा उपद्रव घरांतच होतो असें नाहीं. शेतांतहि होतो. कॉफीच्या झाडावरचीं फळें खाण्यास सोकावलेलीं उदें नेमकीं हंगामाच्या वेळीं आपली पोळी पिकविण्यास तेथें येतात. फळें खातांना ते बिया मात्र फोडून खात नाहींत. त्या त्यांच्या विष्ठेंत तशाच पडतात. विष्ठेंतून वेंचून काढलेल्या बिया इतर बियांप्रमाणेंच चांगल्या रुजतात. शेतकरी अशा बिया इतर बियांबरोबरच सांठवून विकतात. पिंपळ, वड, उंबर यांचीं फळें त्यांना

नेहमीं मिळण्यासारखीं असतात. याखेरीज ताडाच्या झाडावर चढून ताडी पिण्याची हातोटीहि या प्राण्यांना चांगली साधलेली असते.

दक्षिण हिंदुस्थानांतील टेकडावर राहणारी एक उदाची जात आहे. तिचा रंग निव्वळ उदी किंवा **दाट** पिंगा असतो. या जातीचे ऊद भित्रे. असतात. ते मनुष्यवस्तींत किंवा जवळपासहि येत नाहींत.

**जवाद, जवादी मांजर, कस्तूरी** (**Small Indian Civet**). आ. ५७

हें छोटें ऊद होय. याच्या मुख्यांगाची लांबी दोन फूट असून शेपूट साधारण एक फूटभर असते. याचें तोंड सपक असून मानेवर पट्टे, शेपटीवर कडीं आणि इतरत्र ठिपक्यांच्या रांगा असतात.

हें ऊद भारतांत सर्वत्र आढळतें. याची वसति साधारणतः उंच गवतांत किंवा लहानसहान झुडपांत असते. तें उंदीर, बेडूक, खेकडे आणि कृमि-कीटक यांजवर उपजीविका करतें. मधून मधून तें फळेंहि खातें. बोरावर त्यांची भक्ति विशेष असते. याच उदाच्या गंधग्रंथींतून 'कस्तूरी' काढतात.

**मोठें ऊद** ( **Large Indian Civet** ). आ. ५८

या उदाचा आकार सर्वांत मोठा असतो. मुख्य अंग अडीच फूट असून शेपूट मात्र दीडच फूट असतें. रंग मध्यवर्ती करडा, पिवळस किंवा पिंगा असून त्यांत दाट रंगाचे ठिपके व पट्टे असतात. यांच्या पाठीवर लांब काळ्या केसांची एक रांग मधोमध उभी असते. हे ऊद नेपाळ, सिकीम, भूतान, बंगाल व आसाम या प्रांतांत आहेत. इतर भारतांत नाहींत. हे झुडपाखालीं लपून राहतात.

**सील्लू** ( **Tiger Civet** ). आ. ५९

हें एक छोटेसें ऊद आहे. याच्या मुख्यांगाची लांबी १५ इंच असते. शेपूट साधारणतः १४ इंच असतें. याचा मध्यवर्ती रंग सोनेरी असतो. त्यांत काळे ठिपके आणि पट्टे असतात. आकारानें लहान असलें तरी

हें मोठें शूर असतें. हें बहुधा झाडावर राहून पक्षी मारून खातें. याला गंधग्रंथी नसतात. हें ऊद नेपाळ, सिकीम, आसाम या प्रांतांत आढळतें.

मांजराप्रमाणें ऊद देखील रागावलें म्हणजे केस पिंजारतें. असे केस पिंजारले असतांना त्याचें रूप एकदम पालटतें. उदाच्या अंगावर लांबट तसे आखूडहि केस असतात. केस पिंजारले म्हणजे आखूड केस, तोंवर लपलेले असतात ते, स्पष्ट दिसूं लागतात. या केसांचा रंग लांबट केसांच्या रंगाहून निराळा असतो. त्यामुळें एकदम रूप भडक होऊन दिसून येतें. हें रूप पाहिल्याबरोबर ऊदांचे शत्रू बिचकतात. जिवावर बेतली असतां उग्र गंध सोडण्याची ऊदांची संवय असते. ती माहीत असल्यामुळें ऊद-शत्रू हें रूप पाहून ऊदाच्या अंगावर न जातां तेथून निघून जातात. रूपांतराची ही सोय मध्यम ऊदामध्यें चांगली दिसून येते ( आ. ५६ उजवा कोपरा ).

## मुंगूस नकुल. आ. ६०

मुंगूस हें मांजराइतकेंच माणसाच्या परिचयाचें आहे. ऊदाला ऊदमांजर म्हणतात, पण ऊदमुंगूसहि तितक्याच यथार्थतेनें म्हणतां येईल. ऊद हें मुंगसासारखें ठेंगणें आणि केसाळ असतें मुंगसाचें तोंड ऊदापेक्षां चिंचोळें असतें. ऊदाचे कान उंचट असतात तर मुंगसाचे बसके असतात, इतकेंच नव्हे तर ते आणखी दुमडून लहान करतां येतात. मांजराप्रमाणें किंवा ऊदाप्रमाणें मुंगूससुद्धां उंदीर मारून खातें. मांजर किंवा ऊद उंदराच्या बिळांत शिरत नाहीं, पण मुंगूस माती उकरून बिळांत प्रवेश करूं शकतें. उंदीर मिळाले नाहींत तर मुंगूस बारीकसारीक कृमिकीटक मारून खातें. मानवी वस्तींत राहणारीं मुंगसें माणसाचें अन्न खातात, पण त्यांची खरी आवड मांसाचीच असते. मांजर किंवा ऊद सापाला मारूं शकतें, पण मुंगसाला साप मारण्याची विशेष आवड असते. तें त्वेषानें पण युक्तीनें मोठमोठाले विषारी सापसुद्धां मारून खातें. अंग केसाळ असल्यामुळें साप सहसा

मुंगसाच्या अंगांत विष भरूं शकत नाहीं; खरोखरी त्वचेस दंश झाला तर मुंगूसही सर्पविषानें मरतें. मुंगूस असा दंशच सहसा होऊं देत नाहीं.

मुंगूस आफ्रिकेंतून भारतांत आलें आहे म्हणतात. एकूण सहा जातींचीं मुंगसें भारतांत आहेत. मनुष्यवस्तींत किंवा जवळपास जी जात दिसते ती आकारानें मध्यम आहे. रानांत असतात तीं मुंगसें झुडपांच्या आसऱ्याला किंवा दगडांच्या आडोशाला भुईंत बिळें करून राहतात. तीं मांसाहारा-बरोबर फळेंमुळेंहि खातात. या मुंगसांचें मुख्यांग हातभर असून शेपूटहि तितकेंच लांब असतें. उत्तर भारतांत याहून एक छोटें मुंगूस आहे. मुख्यांग साध्या मुंगसापेक्षां मोठें पण शेपूट आंखूड असणारीं आणखी दोन जातींचीं मुंगसें आहेत. त्यांपैकी विशेष मोठें असतें त्याच्या कानामागें खांद्यापर्यंत एक काळा पट्टा असतो. या मुंगसानें सशाची व लहानग्या हरणाची शिकार केल्याचें पाहण्यांत आहे. दुसऱ्या बड्या मुंगसाच्या जातींत मानेवरचा काळा पट्टा पुढें जिवणीपर्यंत गेलेला असतो. अशीं मुंगसें नेपाळ, आसाम, ब्रह्मदेश इकडे आढळतात. तीं पाणथळींत हिंडून खेकडे, गोगलगाई वगैरे कवची प्राण्यांना मारून खातात. यांना अनुक्रमें महानकुल व नकुल म्हणावें. नकुलें केवळ नेपाळ व आसाम येथेंच सांपडलीं आहेत. (आ. ६१)

मांजराप्रमाणें मुंगूसहि माणसाळूं शकतें. पाळीव मुंगसें माणसाच्या वस्तीला मांजरापेक्षांहि अधिक हितावह आहेत. कारण तीं साप, विंचू आणि किडे यांचा मोठ्या आवेशानें फन्ना उडवतात. मांजरी जर वाघाची मावशी तर ऊद आणि मुंगूस हे वाघाचे मामा म्हटले पाहिजेत !

प्रकरण नववें

# मोठे हिंस्र

सिंह आणि वाघ हे मोठे हिंस्र होत. आपण मांजराला वाघाची मावशी म्हणतों तर इंग्रज लोक वाघ-सिंहांना 'मोठीं मांजरें' म्हणतात. तात्पर्य एकच कीं, वाघ काय किंवा मांजर काय दोघांची वृत्ति हिंस्रच. एक आकारानें मोठा आणि दुसरें आकारानें लहान इतकाच फरक. सिंह हा शब्द हिंस् धातूवरून निघाला म्हणतात. सिंह म्हणजे मूर्तिमंत हिंसाच होय. सिंहाला पशूंचा राजा म्हणतात. कारण तो सर्व पशूंहून अधिक पराक्रमी असतो. हत्ती हा सर्वांत मोठा—आकारानें मोठा—पशु आहे. पण त्यालाहि मारण्याचें सामर्थ्य सिंहांत असतें. वाघ हा सिंहाइतकाच पराक्रमी असतो, पण त्याला कोणी राजा म्हणत नाहींत. सिंह आपल्या पराक्रमाची जाणीव ठेवून निर्भयपणें वावरतो. स्वतःच्या जिवाला जपण्याची विशेष चिंता करीत नाहीं. वाघ स्वपराक्रमाची जाणीव ठेवूनहि जपून वावरतो. होतां होईतों चोरट्या पावलांनींच लपून छपून संचार करतो. सहसा स्वतःला धोक्यांत घालीत नाहीं. हा जो थोडासा फरक या मोठ्या हिंस्रांच्या स्वभावांत आहे त्यावरून आणि सिंहाच्या भव्य आकृतीवरून लोकांनीं सिंहालाच मृगपति म्हणजे पशूंचा राजा ठरविला आहे.

गेल्या शतकांत उत्तरभारतांतल्या सर्व रानांत सिंह आढळत असे. हल्लीं तो केवळ गीरवनांतच आढळतो. युरोपीय लोक जेव्हां बंदुका घेऊन येथें आले तेव्हां येथील रानांत शिकारी करणें हा त्यांचा हौशीचा उद्योग होऊन बसला होता. शिकारी करण्यांत पुष्कळ धोका असे हें खरें; पण मोलवान कातडीं, दांत इत्यादि वस्तूंचा लाभहि त्यामुळें होत असे. एका इंग्रजानें एक वर्षांत पन्नास सिंह मारल्याचें लिखित आहे ! असा सपाट्यानें संहार होत गेल्यानें सिंहाची जातच भारतांत नाहींशी होण्याचा समय जवळ येऊन

ठेपला तेव्हां अशा हत्त्येवर कांहीं निर्बंध घातले गेले. शिकारी लोकांनीं सिंहांच्या तशा वाघांच्याहि शिकारी केल्या; पण वाघांच्यापेक्षां सिंहांचा संहार अधिक झाला नाहीं. त्याला कारण सिंहाचें औदार्य आणि भव्यपणा. शिकारी लोकांना वाघापेक्षां सिंहच मारणें आवडे आणि सिंहाला लपून बसण्यापेक्षां उघड वावरणेंच आवडे. परिणामीं सिंहाचीच जात घटत गेली. माणसापुढें जरी सिंहाला अशी हार खावी लागली तरी **मृगेन्द्र** ही त्याची पदवी कायमच आहे; कारण तो सर्व मृगांत म्हणजे पशूंत पराक्रमानें श्रेष्ठ आहेच आहे.

**पंचानन, केसरी.** आ. ६२

सिंह जेव्हां मृगया करतो तेव्हां तो मृगास पकडण्याकरतां तोंड आणि चारी पाय यांचा उपयोग करतो. हत्ती, रेडा, गवय अशा मोठ्या मृगांची मृगया करतांना अशी पांची अवयवांनीं पकड घेण्याची आवश्यकता असते. एरवीं लहानग्या मृगयेला नुसतें तोंडसुद्धां पुरेसें असतें. सिंहाच्या तोंडांत मोठाले सुळे—दात असतात. ते दात लांबट आणि टोकदार असतात. त्यांच्या मध्यंतरीं थोडी मोकळी जागा असते. त्यामुळें ते भक्ष्य मांसांत रोचले म्हणजे एकाशेजारीं एक, दोन विरुद्ध दिशेंत येऊन, गच्च होऊन बसतात. हिंस्र पशूंच्या जबड्याचा सांधा असा असतो कीं तो केवळ खालवरच हालूं शकतो, आजूबाजूला हालूं शकत नाहीं. त्यामुळें एकदां गच्च झालेली मिठी मृगाच्या धडपडीनें सईल होऊं शकत नाहीं. मांस उसकडूनच निघतें. हिंस्रांचे सुळे हे खरे **रदन** म्हणजे उसकडण्याचे दात होत.

सिंहाचे दात जसे मांसांत खोचण्याच्या सोईचे असतात तशीं त्याचीं नखेंहि खोचण्याजोगींच असतात. तीं कणखर, टोकदार आणि वळणदारहि असतात. शिवाय तीं मागें पुढें करण्याच्या सोईचीं असतात. सिंह जेव्हां जमिनीवर चालत असतो तेव्हां त्याचीं नखें दिसत नाहींत. तीं योग्य झापडीच्या खालीं झाकलेलीं असतात. शिकार पकडण्याच्या वेळीं तो तीं

बाहेर काढतो आणि मांसांत रोचतो. एकदां रोचल्यानंतर मृगाच्या धडपडीनें तीं सईल होऊं शकत नाहींत. मांसाचे वाभाडेच काढतात. सिंहाच्या दाताला रदन तसें नखाला **नखर** म्हणतात. शिकार पकडण्याकरितां तोंडाचा तसाच पंजांचाहि उपयोग होतो, म्हणून सिंहाला पंचानन म्हणतात. पजे हे जणूं त्याचीं चार तोंडेंच आहेत. सिंहाचे दात आणि नखें जर उखडून टाकलीं तर तो मेल्यासारखाच होतो

जो उत्खात-खर-**रदन-नखर**-निकर हरि अशक्य न तदन्त।

कर्णपर्व ५०.५७.

सिंहाला पंचानन म्हणतात, वाघाला म्हणत नाहींत. परंतु अर्थतः वाघ देखील पंचानत असतो. सिंह पंचानन असून केसरीहि असतो. त्याला तोंडाभोंवतीं लांब लांब केस असतात. वाघाला तसे नसतात. या केसांना आयाळ म्हणतात. आफ्रिकन सिंहाला भलें मोठें आयाळ असतें. भारतीय सिंहाला जरा कमी असतें. बंगाली वाघाला मुळींच नसतें असें नाहीं, अगदींच तुरळक असतें.

## मृगया, शिकार

मांजरीला वाघाची मावशी म्हणतात त्याच धरतीवर कुत्र्याला ग्रामसिंह म्हणतात. सिंह हिंस्र आहे तसा कुत्राहि हिंस्र आहे. तथापि गांवठी कुत्र्याच्या अंगी हिंस्रपणा बहुतेक नाहीसाच झालेला आहे. मुद्दाम शिकारीकरतां पाळलेले कुत्रे असतात ते मात्र उत्तम हिंस्र असतात. अर्थात् रानकुत्रे उत्तम हिंस्र असतातच. मांजर शिकार करतें आणि कुत्रें शिकार करतें, पण या दोघांच्या शिकारीच्या रीतींत फार फरक असतो. मांजर दबत दबत जाऊन आपल्या लक्ष्यावर एकदम झडप घालतें. कुत्रें लक्ष्यावर भुंकून भुंकून त्याचा पाठलाग करून त्याला दमवून पकडतें. मांजर एकेकटेंच आपली शिकार पकडतें. कुत्र्यांचीं कुटुंबें किंवा मोठाले समाज असतात. सावज अडचणींत असलें तर तें त्याला बाहेर हुसकावून सर्व मिळून मैदानांत गांठतात. संघशः

कुत्रे मोठा गवा, रेडा किंवा प्रसंगीं वाघहि मारूं शकतात. सिंह आणि वाघ लहानपणीं आपल्या मातेबरोबर राहतात. नंतर कांहीं काळ एकेकटे राहतात. मग सोयरीक करून कुटुंबी बनतात. कुटुंबी असतांना कांहीं काळ नराला एकेकऱ्याला शिकार करावी लागते. मादी पिलांजवळ राहते. पुष्कळ वेळां ते जोडप्यानें शिकार करतात. बरेच वेळां या जोडप्याबरोबर पिलेंहि असतात. तीं शिकारीचें शिक्षण घेत असतात. नरापेक्षां मादी थोडी लहान असते.

सिंह किंवा वाघ एकेकटे शिकार करतात तेव्हां ती शिकार मांजराच्या धरतीची असते. जोडप्यानें शिकार करतांनाहि बहुशः ती तशीच असते. मोठें सावज धरतांना एकाची मदत दुसऱ्याला चांगली उपयोगीं पडते. आईबापांबरोबर पिलें शिकारीला निघतात तेव्हां आईबाप पिल्लांनाच पुढाकार देतात. त्यांच्या हातून शिकार निसटूं लागली तर ती पकडण्यास मदत करतात. आफ्रिकेंतल्या सिंहांची एक गोष्ट एका शिकारीकरतां गेलेल्या माणसानें पाहिलेली आहे, ती अशी. रात्रीं एक जिराफी आपल्या पिलासह एका तळ्याचें पाणी पीत होती. इतक्यांत मागून एक सिंहकुटुंब आलें. कुटुंबांत पितरांच्या जोडीला एक साधारण दोन वर्षांचा छावा आणि दोन चार-सहा महिन्यांचे छावे होते. प्रथम मोठ्या छाव्यानें जिराफीच्या पिलावर हल्ला करून त्यास लोळविलें. पण पिलास सोडविण्याकरतां जिराफीनें आपल्या पायाचा एक तडाखा लगावून त्या सिंहछाव्यासच मूर्च्छित पाडलें. इतक्यांत सिंह धावत आला, जिराफी पळूं लागली, तिला सिंहिणीनें आडवलें आणि सिंहानें मारलें. नंतर मोठ्या छाव्याजवळ जाऊन दोघांनीं त्याला हुंगलें. तो मेलेला होता ! जरा वेळ खिन्न मुद्रेनें त्याच्याकडे पाहून त्यांनीं आपल्या लहान छाव्यांना बोलावून घेतलें आणि सर्वांनीं मिळून जिराफीचें आणि तिच्या पिलाचें शव अर्धें अधिक फाडून खाल्लें.

## शूलदंत ( Smilodon ). आ. ६३

सुळे दात हें हिंस्र पशूंचें प्रमुख हिंसासाधन आहे. माणसाचे पुढचे दात ते कातरे, बाजूचे दात त्या दाढा, आणि या दोहोंच्या मधें कोपऱ्यांत किंवा वळणांत असणारे दात ते सुळे होत. माणसाला वरच्या जबड्यांत चार कातरे, दोन सुळे आणि दहा दाढा असतात. वाघाच्या वरच्या जबड्यांत सहा कातरे, दोन सुळे आणि चारच दाढा असतात. खालच्या जबड्यांत दोन दाढा अधिक असतात. वाघाच्या जबड्यांतले कोपऱ्यांतले दात सुळे असतात खरेच, पण पुढले दात कांहीं खरोखरी कातरे नसतात. माणसाला या दातांनीं कातरतां येतें म्हणून त्यांना कातरे म्हटलें इतकेंच. वाघाचे पुढले दात आखूड पण कोचदार असतात. सावज पकडतांना या दातांचा उपयोग रोचण्याकरतांच होतो. नंतर मांस खातांना मांसाचीं टोकें हाडावरून उसकडून काढण्यास उपयोग होतो. यांना कातरे म्हण्यापेक्षां कोचरे म्हणणें बरें. वाघाच्या दाढा थोड्या असतात पण त्या मांस तोडण्याच्या विशेष सोईच्या असतात. अशी दातांची रचना सर्व मोठ्या हिंस्रांत आणि कुत्र्या-मांजरांतहि असते.

सुळे दात हें हिंस्रांचें प्रमुख हिंसासाहित्य आहे म्हणून सांगितलें तें आजकालच्या वाघसिंहाला असतें त्याहून फारच मोठें प्राचीन वाघसिंहाला होतें असें दिसतें. लक्षावधि वर्षांपूर्वीच्या सांगाड्यास असे भले दांडगे सुळे असल्याचें आढळून आलें आहे. एवढे मोठे सुळे असलेला वाघ म्हणा किंवा सिंह म्हणा कोणीच प्राणी आज आढळत नाहीं. असा हिंस्र प्राणी जेव्हां पृथ्वीवर वावरत होता तेव्हां, ज्यांना पकडण्यास एवढेच मोठे सुळे अवश्य होते असे शाकाहारी प्राणीहि वावरत असले पाहिजेत, असें दुसरें अनुमान निघतें. या हिंस्र प्राण्यास शूलदंत असें नांव दिलें आहे. सांगाड्या-वरून एकंदर आकृतीची कल्पना करून अशा शूलदन्ताचें चित्र जें शास्त्रज्ञांनीं प्रकट केलें आहे त्यावरून शेजारची आकृति तयार केली आहे. या प्राण्याचा

आकार विद्यमान वाघसिंहाच्या एवढाच असून त्याचे सुळे मात्र दुप्पट लांब आहेत. याचा एक पुतळा मुंबईच्या मननिकेंत (म्युझियमांत) करून ठेवलेला आहे. केवळ सांगाड्यावरूनच कल्पना करावयाची असल्यामुळें कोणी याला वाघ म्हणतात, कोणी सिंह म्हणतात.

## सिंह (Lion). आ. ६४

इतिहासपूर्व काळांत सिंह इंग्लंड, फ्रान्स या युरोपीय देशांत होता असें तेथील पुराण अवशेषांवरून दिसून येतें. त्या देशांत आज सिंह नाहींत. ग्रीसमध्यें सिंह होते असें त्या देशाच्या इतिहासांत लिहिलेलें आढळतें. आज सिंह आफ्रिका आणि हिंदुस्थान या दोनच देशांत आढळतो. सिंहाचा मूळ देश युरोप. तेथून तो आफ्रिकेंत आणि यावनी देशांच्या मार्गें हिंदुस्थानांत आला असावा असा तर्क आहे. सिंह नर्मदेच्या दक्षिणेच्या वनांत कधींच आला नाहीं इंग्रजांच्या राज्यांत त्याची हत्या इतकी झाली कीं गीरवनाखेरीज इतरत्र तो कोठेंहि शिल्लक राहिलेला नाहीं. आफ्रिकन सिंह हिंदी सिंहापेक्षां आकारानें अमळ मोठा असून त्याचें आयाळ अधिक लांबट असतें. तथापि एकंदर अंगावरील केस मात्र हिंदी सिंहाच्यापेक्षां आखूड असून शेपटीचा गोंडाहि लहानसाच असतो. सिंहिणीला आयाळ नसतें. तिचा आकार भव्य आणि बांधा बळकट असतो. सिंहाचें वजन चारशें पांचशें पौंड असतें. सांबराचेंहि तितकें किंवा त्याहून शेपन्नास पौंड अधिकहि असतें. पण सिंह अशा सांबराला तोंडांत पकडून आपल्या गुहेंत घेऊन जाऊं शकतो. सिंहाचा रंग फिका पिंगा असतो, आयाळ अधिक दाट रंगाचें किंवा काळसर असतें. लांबी शेपटीसह ९॥ (हिंदी) किंवा १०॥ फूट (आफ्रिकन) असते.

सिंहाचा गर्भावधि चार महिने असतो. सिंहिणीस एका विणींत दोन ते पांच पिलें होतात. तीन वर्षांत तीं प्रौढ होतात, पण अंगाची वाढ मात्र पांचव्या वर्षापर्यंत चालू राहते. एकंदर आयुष्य तीस वर्षें असतें. सिंहाच्या

पिलांच्या अंगावर काळे ठिपके किंवा पट्टे असतात. चार सहा महिन्यांनंतर ते मावळून जातात. दाट झाडींत राहणाऱ्या प्राण्यांचा रंग स्वाभाविकपणें ठिपकेंदार होतो. त्यामुळें ते आजूबाजूच्या देखाव्याशीं समरस होऊन जातात. सहसा दुसऱ्याला ओळखूं येत नाहींत. झाडांच्या खालीं जी पानांची छाया पडते तिजमुळें असाच देखावा दिसत असतो. सिंह आज दाट रानांत तसा विरळ रानांतहि आढळतो. तथापि त्याच्या पिलांच्या अंगावर ठिपके असतात. यावरून तो मूळचा दाट रानांत राहणारा आहे असा तर्क होतो. पश्चिम आशियांतील ज्या देशांत सिंह पूर्वीं विपुल होते त्या देशांत— यावनी देशांत— दाट वनें नव्हतीं, साधारण विरळ वनें किंवा अरण्येंच होतीं.

## व्याघ्र, वाघ

ज्याचें घ्राणेंद्रिय विशेष तीक्ष्ण आहे तो व्याघ्र अशी व्याघ्र या शब्दाची व्युत्पत्ति सांगतात. वाघ-सिंह-कुत्रीं-मांजरें सर्वच आपआपल्या भक्ष्याचा वास घेतात. भक्ष्य दिसलें नाहीं तरी तें त्यांना वासावरून समजून येतें, किंबहुना दृष्टीनें न समजणारा भक्ष्यगुण वासानें समजतो म्हणून ते नाकाचा उपयोग सर्वदा करतात. त्यांच्या नाकांतील कपाऱ्या माणसाच्या नाकांतील कपाऱ्यांच्या मानानें पाहतां बऱ्याच मोठ्या असतात. सिंहापेक्षां वाघाचें घ्राणेंद्रिय अधिक विस्तृत आहे असें नाहीं, पण कमी आहे असेंहि नाहीं. कोणत्या तरी गुणावरून नांव द्यावयाचें तें या गुणावरून दिलें इतकेंच.

वाघाच्या पांच जाती हिंदुस्थानांत आहेत. त्या अशा:—

**पट्टित व्याघ्र, पट्ट्या वाघ** Tiger (आ. ६५). हा वाघ सिंहाएवढा मोठा असून रंगानें अधिक पिवळा आणि पट्टेदार असतो. झाडाच्या सावलीची अनुकृति याच्या अंगावर आढळते. पोटाचा भाग फिका किंवा पांढराच असतो. वाघ दिवसाउजेडीं दाट झाडांच्या छायेंत राहतो. त्याची वस्ती नित्य ओला गारवा असलेल्या रानांत असते. बंगालामध्यें तो दलदलींत राहतो.

उन्हाच्या वेळीं तो पाण्यांत डुंबतो देखील. वाघिणीला सिंहिणीप्रमाणेंच एका वेतांत दोन ते पांच पिलें होतात. गर्भावधि, आयुष्य इ० सिंहिणीप्रमाणेंच.

**भल्लात व्याघ्र, बिबळ्या वाघ** Leopard, Panther (आ. ६६). हा वाघ आकारानें पट्ट्या वाघापेक्षां लहान असतो. लांबी शेपटीसह ७ ते ८ फूट असते. यांपैकीं शेपूट ३ ते ३॥ फूट असते. याच्या अंगावर बिब्यासारख्या वाटोळसर काळ्या खुणा असतात. या खुणा पाठीवर आणि कुशीवर मोठाल्या असून पोकळ असतात. हा वाघ सर्व प्रकारच्या रानांत आढळतो. याला गारवा आणि गाढ छाया अवश्य असते असें नाहीं. साधारण सावलींत तो राहूं शकतो. अंगानें लहान असल्यामुळें तो मोठ्या जनावरांच्या वाटेस जात नाहीं. पट्ट्या वाघ आपली शिकार हिरावून नेईल कीं काय अशी त्याला भीति वाटते, म्हणून तो ती झाडावर नेऊन ठेवतो. पट्ट्या वाघ सहसा झाडावर चढत नाहीं, बिबळ्या सहज चढतो. मोठ्या रानांत आपली डाळ शिजत नाहीं म्हणून हा मनुष्यवस्तीजवळ येऊन पाळीव जनावरांवर ताव मारतो. पट्ट्यापेक्षां याला अधिक लवकर संतति होते.

**शबल व्याघ्र, शबळा** Ounce, Snow Leopard (आ. ६७). हा वाघ बिबळ्यापेक्षां अमळ लहान असतो. लांबी ६॥ फूट असून त्यापैकीं शेपूट ३ फूट असते. याचा रंग करडा असून त्यांत वाटोळे पोकळ ठिपके असतात. खालचें अंग पांढुरकें असतें. हा वाघ हिमालयाच्या ज्या भागांत हिवाळ्यांत हिम पडतें त्या भागांत राहणारा आहे. हिम पडलें म्हणजे तेथील हरिणें अमळ खालीं उतरतात तेव्हां हाहि त्यांच्या मागोमाग उतरतो. हा झाडावर चढणारा आहे.

**मेघांक व्याघ्र, ढगळा** **Clouded Leopard** (आ. ६८). हा वाघ आकारानें शबळाएवढा किंवा त्याहूनहि थोडा लहानच असतो. याचें शेपूट जवळ जवळ मुख्यांगाइतकें लांब म्हणजे तीन फूट असतें. याचा रंग दाट काळसर पिंगट असून त्यांत पाठीवर आणि कुशीवर ढगांप्रमाणें मोठाल्या खुणा

उमटलेल्या असतात. याचे सुळे विशेष मोठे असतात. सर्व हिंस्रांत याच्याच दातांची ठेवण शूलदंताच्या अधिक जवळची आहे. हे वाघ नेपाळ, सिकीम, भूतान, आसाम या प्रांतांतच आढळतात. हा वाघ दाट नित्यपर्णी झाडें असलेल्या वनांत राहणारा आहे. बळकट दात असल्यामुळें हा मोठालीं सांबरें मारूं शकतो.

**चित्रांक व्याघ्र, चित्ता** Hunting Leopard (आ. ६९). या वाघाचें मुख्यांग तीन फूटच असतें पण शेपटीची लांबी बरीच कमी असते. लांबलचक पाय, कोठेदार छाती, लहानसें गोलसर डोकें, आणि उघडीं नखें, हे या वाघाचे विशेष आहेत. याच्या अंगावरचे ठिपके लहानसे पण भरीव असतात.

पन्नास वर्षांपूर्वीं भारतीय रानांत चित्ते विपुल आढळत पण हल्लीं ते क्वचितच आढळतात. कुत्र्याप्रमाणें हे चित्ते शिकारीसाठीं पाळण्याची चाल आहे. पाळलेल्या चित्त्याला भांड्यांत काढलेलें जनावराचें रक्त पिण्याची संवय लावलेली असते. चित्ता अतिशय चलाख असतो. फार थोडा वेळ पण अतिवेगानें तो धावतो. मृगांमध्यें अत्यंत वेगवान् जें हरिण त्याहीपेक्षां याचा वेग मोठा असतो. मोजून पाहिला असतां तो एका मिनिटांत दीड मैल इतका आढळून आला आहे. शिकार करतांना त्याला इतका वेळ पळावें लागतच नाहीं. याच्या अर्ध्या वेळांत तो आपली दौड संपवितो. शिकारीकरतां चित्ता नेतांना त्याचे डोळे झांकून ठेवतात. जें सावज पकडावयाचें त्याच्यासमोर नेऊन ते उघडे करतात. चित्ता सावज न्याहाळतो आणि तें एका दौडींत सांपडेल इतक्या जवळ हळूच दबत दबत जातो. मग एकदां सपाट्यानें धाव मारतो कीं सावज पळूं लागलें तरी त्याला तो गाठूं शकतो आणि चट्दिशीं पकडून ठेवतो. नंतर मालक तेथें येऊन त्या सावजाचा गळा कापून थाळींत रक्त सांडूं देतात. तेवढें पिऊन चित्ता संतुष्ट राहतो. एखाद्या मिनिटापेक्षां अधिक काळ तो धांव मारीत नाहीं.

तेवढ्यानें मृग न सापडेल तर मृगया सोडून देतो. चित्ते पाळण्याची चाल संस्थानिकांत फार रूढ असे.

रानचित्ते बहुधा हरिणें, ससे आणि पक्षी यांचाच संहार करतात. ते गाई-म्हशींच्या वाटेस गेलेले पाहण्यांत आलेले नाहींत.

## स्पर्धा

सिंहानें किंवा वाघानें एखादी शिकार मारल्यावर दुसरा कोणीतरी ती हिसकावून किंवा चोरून नेईल कीं काय अशी भीति त्याला सतत वाटत असते. त्यामुळें तो आपली शिकार कोठेंतरी आडोशाला नेऊन खात बसतो. शिकार एका सपाट्यांत खाऊन संपण्याजोगी नसली तर ती लपवून ठेवून वेळोवेळीं तिचा समाचार घेतो. गवा किंवा महिष असा फार मोठा बळी घेतला असल्यास तो दूरवर नेणें शक्य नसतें. तेव्हां तो जेथल्या तेथें पडूं देऊन भुकेच्या वेळीं नेमका त्या जागीं येऊन त्याचें भोजन करणें त्याला भाग पडतें. अशा प्रसंगीं इतरांना त्यांतला वांटा चोरण्याची किंवा त्याच्याशीं लढाई करून जिंकण्याची संधि असते. एकट्या वाघाला धुडकावून लावून कुत्रे शिकार जिंकतात, किंवा त्या वाघाचीच शिकार करतात. एका वाघाची शिकार दुसरा वाघ जिंकतो असेंहि घडतें. आपली शिकार वाघाकडून जिंकली जाण्याची भीति बिबळ्याला फार असते. म्हणून तो आपली शिकार झाडावर नेऊन ठेवतो. तरस हे सराईत चोर होत. लांडगे दुसऱ्याच्या शिकारीची लाटालाटी किंवा वाटमारी करतात. कोल्हेहि पुष्कळसा हा चोरीचा धंदा करतात. सिंहानें मोठी शिकार मारली म्हणजे भिक्षांदेही करण्यांत कोल्हे चतुर असतात. सिंह अशा भिक्षेकऱ्यावर दया करतो. कोणीहि शिकार केली तरी त्यावर घारी, गिधाडें, कावळे यांची धाड पडतेच. सुखासुखी कोणी कोणाला घास खाऊं देत नाहीं. म्हणून मोठी शिकार मारणारा सिंह किंवा वाघ आपल्या शिकारीचा उत्तम भाग

प्रथम खाऊन टाकतो. अडचणीच्या प्रसंगीं सिंह सुद्धां दुसऱ्याची शिकार हिसकावून घेण्यास मागेंपुढें पहात नाहीं.

वाघ, सिंह दुबळे झाले म्हणजे रानटी जनावरें मारण्यापेक्षां पाळीव पशू मारणें त्यांना सोपें जातें, म्हणून ते त्यांच्याच पाळतीवर राहतात. अशा हिंस्रांना सूर्यास्तानंतर रानांत चुकून मागें राहिलेलें किंवा दिवस उगवण्यापूर्वीं रानांत आलेलें जनावर प्रथम सांपडतें आणि मग त्यांची चटक उत्पन्न होते. अशा सोप्या शिकारीला चटावलेले हिंस्र पशू माणसावरहि चाल करतात. इतर पशू त्यांच्या वाटेस गेल्याखेरीज माणसावर हल्ला करीत नाहींत.

कांहीं दिवसांपूर्वीं हिमालयांतील यात्रेच्या वाटेवर वाघांनीं पुष्कळ मनुष्यबळी घेतले. तेव्हां मुद्दाम शिकारी नेमून त्या वाघांना मारण्यांत आलें. त्या प्रसंगीं शोध करतांना असें आढळलें कीं, त्या वाघांपैकीं ( १ ) कांहीं शिकारी लोकांच्याच बंदुकीच्या गोळीनें दुखावलेले होते, ( २ ) कांहीं साळूचे कांटे लागून दुखावलेले होते, आणि ( ३ ) कांहीं यात्रेकरूंचीं शवें, गंगेंत म्हणून टाकलेलीं परंतु गंगेच्या तीरावरच पडलेलीं, खाण्यास मिळाल्यामुळें माणसाच्या मांसास चटावलेले होते.

एकूण हिंस्र पशूंना आपल्या भक्ष्य पशूवर मात करावी लागते इतकेंच नव्हे तर स्वजातीयांशीं लढा द्यावा लागतो. ही गोष्ट कांहीं सोपी नसते.

न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगाः ।।

---

## प्रकरण दहावें

# वानर

सर्व प्राण्यांमध्यें उत्तम प्राणी किंबहुना सर्व जीवांमध्यें उत्तम जीव म्हटला म्हणजे मनुष्य हा होय, यांत शंका नाहीं. मानवाची बरोबरी करणारा तर राहोच पण त्याच्या खालोखाल जवळपास सुद्धां गणण्याजोगा दुसरा प्राणी नाहीं म्हटलें तरी चालेल. **वानर** हे नराच्या थोडेसे जवळ येतात, पण इतर कोणत्याहि दोन जातींत आढळतें त्याहून नर-वानरांमध्यें अंतर अधिक असतें. **वाचा** ही एकच करामत हें महदंतर पाडण्यास समर्थ आहे. केवळ वाचा हें कर्मेंद्रिय माणसास श्रेष्ठत्व आणतें असें नव्हे, तर वाचा ही ज्या विचारांना मुक्तद्वार देते ते **विचार** या श्रेष्ठतेचें विशेष कारण होय. व्याख्येकरतां **माणूस हा वाचावंत प्राणी** असें म्हणतां येईल. पण अंतर्गत इंद्रियांच्या गुणवत्तेस अनुलक्षून बोलणें असल्यास **उत्कृष्ट मेंदू** असलेला प्राणी तो माणूस असें म्हणणें योग्य आहे. माणसाचा मेंदू परम उत्कर्ष पावलेला आहे ही गोष्ट लक्षांत आणतां, एकट्या एक माणसाचाच स्वतंत्र गट कल्पिला पाहिजे.

मनुष्याच्या खालोखाल वानरांचे गण येतात. त्यांत **कपि, मर्कट** आणि **लांगूर** यांचा समावेश होतो. **कपि पुच्छहीन** आणि **दीर्घबाहु** असतात. त्यांना शेंपूट नसतें. आणि त्यांचे हात भले मोठे आणि लांबलचक असतात. त्या मानानें त्यांचे पायच आखूड आणि दुर्बल असतात. ते माणसाप्रमाणें दोन पायांवर चालतांना दिसतात. तथापि त्यांचा संचार बहुधा झाडावर असून हातांनीं झोके घेत ते उड्या मारतात. इतर वानरें चालतांना हात आणि पाय खालीं टेकतात आणि पायांनीं उशी घेऊन उड्या मारतात. त्यांचे पाय हातांपेक्षां प्रबल असतात. सर्व वानरें अन्न हातांत धरून तोंडाशीं नेतात. कपींची एकच जात भारतांत आहे. ती-आसामामध्येंच केवळ आढळते.

**मर्कट** हे ठेंगणे पण जाडी बांध्याचे असतात. लांगूर उंच आणि पातळ बांध्याचे असतात. मर्कटांचीं तोंडें उजळ तर लांगुरांचीं काळपट असतात. मर्कटाच्या **गालास एक खिसा** असतो. तें खाणें खाऊं लागलें म्हणजे गपागपा खातें तेव्हां गालाच्या खिशांत सांठवण करून ठेवतें. मग सवडी-प्रमाणें त्याचें चर्वण करतें. **लांगूराला** अशी सोय नसते; परंतु त्याच्या **जठराला तीन पुडे** असतात. त्यांत सावकाशपणें क्रमशः पचन होण्याची सोय असते. सर्व वानर शाकाहार करतात. त्यांत पानें, फुलें, फळें, अंकुर यांचा समावेश असतो. लांगूर केवळ शाकाहारी आहेत, पण मर्कटें थोडासा कृमिकीटकांचा आहार करतात. सर्व मर्कटांच्या ढुंगणास बैठकीचे घट्टे असतात.

### १ कपि उलूप ( Hoolock Gibbon ). आ. ७०

कपि या श्रेष्ठ गणांतील एकच जात भारतांत आहे ती **उलूप** ही होय. या जातीच्या नराचा रंग काळा आणि मादीचा पिंगट पांढरा असतो. पिलें भुरकट रंगाचीं असतात. त्यांना पांच-सहा वर्षांत प्रौढत्व येतें. त्या वयांत रंग स्पष्टपणें पालटतात. हे वानर पायांवर उभे राहून झाडांच्या फांद्यांवर चालतात. चालतांना हातांनीं तोल सावरतात. उभेपणीं त्यांची उंची ३′ पर्यंत भरते. बाहूंची लांबी पायांच्या दुप्पट असते. हे कुटुंब करून राहतात. कुटुंबांत पतिपत्नी आणि अप्रौढ संतति असा संच असतो. हे एकपत्नीकच असतात. आपल्या उपजीविकेसाठीं एक कुटुंब एक प्रांत ठरवून घेतें. असा ठराव होतांना क्वचित् भांडणें होतात. तीं युद्धानेंच मिटतात. त्यानंतर एकमेकांच्या वाटेस न जातां आपापल्या प्रांतांत उपजीविका करतात. असें एखादें प्रांतराज्य स्थापन केल्याखेरीज नवतरुणांना कुटुंब करतां येत नाहीं. कपि-उलूपाची वसति आसाम आणि त्याच्या पूर्वेच्या प्रदेशांत आहे.

### २ दक्षिणी मर्कट, माकड ( Bonnet Macaque ). आ. ७१

माकड सहसा नुसत्या पायांनीं चालत नाहीं. हातांपायांनीं चालतें. त्याची बैठी उंची २′ असते. केसांत कपाळावर मधोमध भांग असून डोक्यावर

भोंवरा असतो. रंग हिवाळ्यांत पिंगा आणि उन्हाळ्यांत करडा असतो. यांची वसति गोदावरी नदीच्या दक्षिणेस आहे.

या मर्कटांच्या २० ते ३० जणांच्या टोळ्या असतात. अनेक नर आणि माद्या एकाच टोळींत आढळतात. शिवाय केवळ तरुण नरांचे वेगळे कळपहि असतात. यांना प्रौढ होण्यास पांच वर्षें लागतात. यांचें आयुष्य सुमारें १५ वर्षें असतें. एखादें माकड तीस वर्षें जगल्याचीं उदाहरणें आहेत. गर्भ सहा महिने असतो. हीं वानरें सहज माणसाळतात. हीं मनुष्यवस्तींत किंवा त्याच्या आसपासच्या शेताभातांत चोऱ्या करण्यांत पटाईत असतात. हीं अतिशय खोडकर असतात. यांच्या चेष्टा ‘माकडचेष्टा’ म्हणून प्रसिद्धच आहेत. हीं वानरें सर्कसवाल्यांना फार धार्जिणी आहेत; कारण हीं समजूतदारपणें चांगले खेळ करूं शकतात.

### **३ उत्तरी माकड** ( Rhesus Macaque ). आ. ७२

हेंहि माकड हातापांयावर चालणारें आहे. याची बैठी उंची २′ च असते. याच्या डोक्याचे केस कपाळापासून मागें वळलेले असतात. याच्या केसांमध्यें भांग नसतो. याच्या ढुंगणावरील केसांना नारिंगी रंग असतो. यांची वसति हिमालयाच्या पायथ्यापासून दक्षिणेस तापी आणि गोदावरी या नद्यांपर्यंत आहे. यांचा संचार जंगलांच्या परिसरांत मनुष्यवस्तीच्या आसपास विशेष असतो. हे उन्हाळ्यांत मजेनें पोहतात. यांचे लहानमोठे कळप असतात.

### **४ आसामी माकड**. आ. ७३

हेंहि माकड हातापायांवर चालणारें आहे. याची बैठी उंची २′ च असते. याची शेपूट मात्र बरीच आखूड केवळ म्हणजे ८″ असतें. हें इतर माकडांपेक्षां जाड आणि जडहि असतें. याच्या केसांस भांग नसतो आणि ढुंगणावर वेगळा रंगहि नसतो. याची वसति आसाम आणि त्याच्या पूर्वेचे प्रदेश यांत आहे.

हें भेडसावलें असतां झाडावरून खालीं येऊन गवतांत लपतें. हीच प्रवृत्ति इतर वानरांतहि थोड्याबहुत मानानें आढळते. खोडकरपणा वगैरे स्वभाव इतर माकडांप्रमाणें असतो.

**५ मर्कटसिंह** ( Lion-tailed Macaque ). आ. ७४

हेंहि मर्कट हातापायांवर चालणारेंच आहे. याचीहि बैठी उंची २ असून शेपूट १२″ असतें. यास सिंहासारखें आयाळ असतें. त्यावरून यास वानरसिंह असें नांव पडलें आहे. वानरांपैकीं मर्कट वर्गांत त्याची गणना होते हें दर्शण्याकरतां त्यास मर्कटसिंह असें म्हटलें आहे. याच्या आयाळाचा रंग पिवळसर असून इतरत्र मात्र रंग काळसर असतो.

यांची वसति पश्चिम घाट, त्रावणकोर आणि कोचीन येथें असते. हीं नित्यपर्णी वनांत राहतात. सहसा माणसाळत नाहींत. पिंजऱ्यांत कोंडलीं असतां उग्र रूप धारण करतात.

**६ हनुमान, लांगूर** ( Common Langur ). आ. ७५

हीं वानरें हातापायांवर चालतात. यांची बैठी उंची २′ ६″ असून शेपूट ३′ ४″ असतें. डोकें पांढरें, तोंड काळें आणि इतर अंग मिश्र रंगांचें असतें. अंगाचा रंग रुक्ष प्रांतांत पावसाळी प्रांतांत असतो त्यापेक्षां अधिक काळसर असतो.

यांची वसति भारतांत सर्वत्र आहे. पश्चिमेच्या ओसाडींत मात्र नाहीं. यांचे कळप आढळतात. प्रौढ नरमाद्या एका कळपांत असतात. कांहीं कळप केवळ तरुण नरांचेच असल्याचें आढळून येतें. एखादा प्रौढ नर एकाकीच आढळतो.

**७ टोपीवाला लांगूर** ( Capped Langur ). आ. ७६

हीं वानरें हातापायांवरच चालतात. यांची बैठी उंची २′ ४″ असून शेपूट ३′ ४″ असतें. यांचा रंग पिंगट असतो. पण त्यांतल्या त्यांत टोपी काळसर, पाठ काळसर आणि पोट व छाती तांबूस असते. यांची वसति

आसामपासून पूर्वेकडील देशांत आहे. यांचा संचार सर्वदा झाडावरच असतो. हे पाणी पिण्यास देखील सहसा खालीं उतरत नाहींत. पावसाचें पाणी पानावरून वाहतें तें, किंवा दंवाचे थेंब पिऊन तहान भागवतात. यांचे लहानमोठे कळप असतात. हिवाळ्यांत कळप लहान लहान असतात. त्यांत एकच नर आणि चार पांच माद्या असतात. केवळ नरांचेहि कळप असतात, पण केवळ माद्यांचे नसतात. उन्हाळ्या-पावसाळ्यांत कळप मोठाले असतात. त्यांत अनेक प्रौढ नर व माद्या असतात.

**८ निलगिरी लांगूर, मंडी.** आ. ७७

हें लांगूर हातापायांवरच चालतें. याची बैठी उंची २′ ७″ व शेपूट २॥′ ते ३′ असतें. डोकें पिंगट पांढरे असून इतर अंग मात्र ठिक्कर काळें किंवा काळसर-पिंगें असतें. यांची वसति निलगिरीच्या नित्यपर्णी रानांत आहे. आंखूड आयाळ आणि लांब शेपूट यांवरून तें मर्कटासिंहाहून वेगळें ओळखूं येतें. यांचे दहापांच जणांचे कळप असतात. दुखावलेले नर एकाकी राहिलेले आढळतात. अनेक कळप जूट करून किंवा अलग राहून शेतींवर धाड घालतात.

**९, १० लेमूर, लठ्ठ लोरिस आणि लुकडें लोरिस.** आ.७८, ७९

**(Slow loris and Slender loris)**

जीवोत्तम या प्रगणांत नर आणि वानर यांखेरीज लेमूर या पशुगणाचा समावेश होतो. हे प्राणी माणसासारखे दिसत नाहींत. त्यांच्या मेंदूची वाढ विशेष नसते. तरी त्यांची गणना या श्रेष्ठगणांत केली आहे. याचें कारण असें कीं त्यांच्या हातापायांची रचना वानरांच्यासारखी असते. त्यांचे अंगठे इतर बोटांपासून अलग असून चांगले वाढलेले, आणि इतर बोटांविरुद्ध वळण घेऊन पदार्थ पकडण्यास उपयोगी पकडण्याजोगे असतात. पायाचा अंगठाहि असाच पकडीस योग्य असतो. याखेरीज त्यांच्या पायाच्या बोटाचा विशेष असा असतो कीं आंगठ्याशेजारच्या बोटाला मांजराच्या नखरासारखें

नखर असतें. त्याच्या योगानें ते आपलें अंग साफ करतात. यांची वसति झाडावरच असते. त्यांच्या दोनच जाती भारतांत आहेत. एक आसामांत आणि तत्पूर्वदेशांत आहे. ती जाडजूड आहे. दुसरी दक्षिण टोकाशीं आहे ती काटकिळी आहे. यांना अनुक्रमें **लठ्ठ लोरिस** आणि **लुकडें लोरिस** अशीं नांवें आहेत. पहिल्याची उंची १′ आणि दुसऱ्याची ९″ असते. यांना शेपटीचा केवळ बुडखाच असतो. लोरिसें झाडावर राहतात. पालाफळें, किडे हें त्यांचें खाद्य असतें. तीं दिवसाउजेडीं लपून राहून रात्रीं हिंडतात. त्यांना उड्या चांगल्या मारतां येतात.

## शाखामृग

माणसाच्या शरीराच्या घडणींत, हातापायांत तारतम्य असतें तें असें कीं हात विशेषतः चळवळे आणि पाय विशेषतः कमचळे पण खंबीर असे असतात. वानरांच्या हातापायांत असें तारतम्य कमी असतें. कपीचे हात पायापेक्षां लांबट आणि प्रबळ असतात. मर्कटाचे आणि लांगूराचे पाय हातांपेक्षां प्रबळ आणि लांबट असतात. कपींच्या हाता-पायांतील भेद पुष्कळ असतो, मर्कटलांगूरांच्या हातापायांत भेद बराच कमी असतो. परंतु कांहीं झालें तरी सर्वांचेच पाय माणसाच्या पायांपेक्षां अधिक चळवळे असतात. वानर हातांनीं वस्तु पकडतात तसे पायांनींहि पकडतात. हाताचा आंगठा इतर बोटांपासून अलग असून त्याविरुद्ध वळण घेणारा असतो. त्यामुळें मूठ वळतां येते. वानरांच्या पायाचा आंगठाहि हाताच्याप्रमाणें अलग आणि विरुद्ध वळणाचा असतो. त्यामुळें त्यांना **पायांनींहि मूठ वळतां येते.** मर्कट आणि लांगूर हात टेकून चालतात. चालतांना ते पायाचा चवडा टेकतात, टाचा टेकत नाहींत. उभे राहतांनाच टाचा टेकतात. कपी उभे चालतात ते टाचा टेकतात. माणसाच्या मनगटामागें बाहूंत दोन लांबडीं हाडें असतात, त्यांच्यांत फिरकी सांधा असतो; परंतु टाचेच्या वर जंघेंत दोन लांबडीं हाडें असतात त्यांत फिरकी सांधा नसतो. तीं हाडें पक्केपणीं

सांधलेलीं असतात. वानरांमध्यें जंघेचीं हाडें सुद्धां फिरकी पद्धतीनें सांधलेलीं असतात. त्यांना हात उताणा-पालथा करतां येतो तसा पायहि उताणा-पालथा करतां येतो.

माणसाला दोन पायांवर उत्तम प्रकारें चालतां येतें. तसें करतांना तो हाताचा उपयोग तोल सांभाळण्याकडे सहजगत्या करतो. विशेष अडचण असेल तेथें हात पसरून तोल सावरण्याचा विशेष प्रयत्न करावा लागतो. झाडांच्या फांद्यांवरून चालतांना कपी तसेंच करतात. तारेवरून चालतांना माणूस हातांत आडवी काठी घेतो. कपीला झाडावरून चालतांना लांबलचक हातांचाच उपयोग होतो. आसपास फांद्या असतात त्या पकडणें सोईचेंच असतें. याप्रमाणें संचरणाला पायांपेक्षां हातांचाच उपयोग अधिक होऊन त्यांचे हात लांबलचक झाले आहेत असें दिसतें. मर्कट आणि लांगूर झाडा-वर तसेंच भूमीवरहि संचार करतात. **कपी** भूमीवर संचार फार कमी करतात. ते वृक्षसंचारीच बनले आहेत. त्यांचे पाय संचरणाचे गौण अवयव आणि हात हे प्रधान अवयव झाल्यामुळें त्यांना **बाहुसंचारी** म्हणतात. संस्कृतांत **शाखामृग** असा वानरवाचक शब्द आहे तो **वृक्षसंचारी** या अर्थाचा आहे.

## वृत्ति अहिंस्र, बुद्धि कुंठित

शाकाहारी असल्यामुळें वानरांच्या दातांची ठेवण आणि घडण माणसांच्या सारखीच असते. त्यांचे दात बत्तीस असतात. त्यांतील सुळे माणसाच्यापेक्षां मोठाले असतात. त्यांचा उपयोग खाद्य सोलण्याकडे होतो तसाच भांडणाच्या प्रसंगीं प्रतिपक्षीयाला चावण्यामध्येंहि होतो. वानर **स्वभावतः भित्रे** आहेत. परक्यावर धावून जाणें हा त्यांचा स्वभाव नाहीं. त्यांचे **जन्मजात शत्रू** म्हणजे **सुसर** आणि **बिबळे** किंवा खरडे. खरडे त्यांना मारण्याकरतां झाडावर चढतात. त्यामुळेंच भय वाटलें कीं झाडावरून उडी टाकून गवतांत लपण्याची स्फूर्ति यांना होते असें दिसतें. भय वाटलें

कीं पळून जावें ही प्रथम प्रवृत्ति असते. भय झाडावरच आहे अशी भावना झाली कीं खालीं पळावें हें साहजिकच आहे. पाण्याच्या आसपास गेलें असतां सुसरींचें भय, पण झाडावर असतांना खरड्यांचें भय अशी स्थिति असते. त्यामुळें त्यांचा कल जमिनीवरील गवताचा आश्रय घेण्याकडे होत असावा. अजगर किंवा इतर **साप** यांना इतर पशू भीत नाहींत, परंतु वानरें फार भितात.

गाई, म्हशी किंवा हरिणें यांना वानरांचें भय वाटत नाहीं आणि वानरांनाहि त्यांचें भय वाटत नाहीं. वानरें झाडावर पानाफळांचा आहार करीत असतात तर त्याच झाडाखालीं गाई किंवा हरणें चरत असतात असा देखावा वारंवार दिसतो. वानरें आहार करतांना पुष्कळ पानें, फुलें, फळें, खालीं टाकून देतात. त्यावर मृगांची उपजीविका चालते. सर्वांनाच हिंस्र पशूंचें भय वाटतें. कोणाही एकानें भयाचा सूर काढला कीं सर्वांचीच पळापळ होते. वानरांच्या हातांची घडण पाहतां **काठीचा किंवा दगडाचा उपयोग शस्त्रास्त्रांसारखा करणें त्यांना अशक्य नाहीं; परंतु तसें करणें त्यांना कधींहि सुचत नाहीं.** प्रसंगविशेषीं ते आपल्या नखांचा आणि दातांचा उपयोग शस्त्राप्रमाणें करतात. झाडाच्या काम्यांचा उपयोग ते करीत नाहींत असें नाहीं. घरटीं बांधण्याकरतां ते काम्यांचा उपयोग करतात, परंतु शस्त्र म्हणून करीत नाहींत. पाळीव वानरें मात्र माणसाच्या अनुकरणानें किंवा शिकवणीनें शस्त्रांचा उपयोग करतात; परंतु तो देखील हत्येकरतां नसून खोडी, गंमत, आज्ञापालन, याच उद्देशानें करतात. यावरून वानर स्वभावतः अहिंस्र आहेत हें तर सिद्धच आहे पण आणखी हेंहि सिद्ध आहे कीं त्यांची बुद्धीहि कुंठित झालेली आहे.

हारं वक्षसि केनापि दत्तमज्ञेन मर्कटः ।
लेढि जिघ्रति संक्षिप्य करोत्युन्नतमाननम् ॥

## हरि आणि हरिण

हिंस्र पशूंचीं ज्ञानेंद्रियें हिंस्यांपेक्षां अधिक कार्यक्षम असतात. गरीब बिचारें हरिण हिंस्यप्रतीक आणि हरि म्हणजे सिंह हें हिंस्रप्रतीक आहे. **हरिणाचे डोळे टपोरे** असतात पण त्यांची **दृष्टि** सहसा एकाग्र नसते. ती बहुधा **व्यग्र** असते. हरिण डाव्या डोळ्यानें डावें क्षेत्र आणि उजव्या डोळ्यानें उजवें क्षेत्र न्याहाळीत असतें. सिंहालाही डावा उजवा असे दोन डोळे असतात. पण सिंह जेव्हां सावज न्याहाळून पाहतो तेव्हां तो आपल्या लक्ष्यावर दोनहि डोळ्यांची दृष्टि एकवटतो. **सिंहाची दृष्टि एकाग्र** असते. माणसाची दृष्टीहि सिंहासारखी एकाग्र असते. आपणाला आपली दृष्टि थोडीशी व्यग्र करतां येते पण हरिणाइतकी व्यग्र करतां येत नाहीं. आपल्या व्यग्र दृष्टीला आपण शून्य दृष्टि म्हणतों. शून्य दृष्टीला दृश्य दिसतें; पण अगदीं पुसट. **एकाग्र दृष्टीनें** मात्र **स्पष्ट दिसतें**. हरिणांची दृष्टि व्यग्र असल्यामुळें त्यांना दृश्य स्पष्टपणें कधींच दिसत नाहीं. पण सिंहाला नेहमीं दिसतें हें उघडच आहे. तथापि हरीपेक्षां **हरिणाचें दृष्टिक्षेत्र** पुष्कळच **विस्तृत** असतें यांत शंका नाहीं. हरिणांना भक्ष्य न्याहाळण्याची गरज नसते. तें विपुल मिळतें. परंतु शत्रू न्याहाळण्याची मात्र फार गरज असते. त्यासाठीं त्यांना दाही दिशा एकदम दिसल्या तरी हव्या असतात. मोठ्या हिंस्र पशूंना आपलें सावज नेमकें न्याहाळण्याची गरज असते. त्यांना स्वतः इतर शत्रूंचें भय नसतें.

हरिणी आपलें अपत्य वासानें ओळखतें. गाय तसेंच करते. हिंस्र पशू शत्रू मित्र दृष्टीनें ओळखतात आणि वासानेंहि ओळखतात. हरिणीला दुरून दिसलेलें तसेंच आहे कीं नाहीं हें ठरवण्याकरतां जवळून वास घेण्याची अपेक्षा असते तशी सिंहाला नसते. हिंस्र पशूमध्यें घ्राणेंद्रियांचा उत्कर्ष झाला आहेच पण त्याहीपेक्षां दर्शनेंद्रियांचा उत्कर्ष अधिक झालेला आहे.

**वानर हिंस्र नाहींत तरी त्यांची दृष्टि सिंहाप्रमाणें एकाग्र असते** म्हणून त्यांनाहि सिंहाप्रमाणें हरि अशी संज्ञा मिळालेली आहे.

## उपसंहार

वानरांना श्रेष्ठ प्राणी म्हणतात तें त्यांच्या बुद्धिमत्तेवरून हें उघड आहे. माणसाला सर्वांत जवळचा प्राणी कोणता वाटत असेल तर तो वानर हाच होय. कपींना शेपूट नसतेंच पण त्यांना वाचाहि नसते. ती जर असती तर ते मानव बनले असते अशी सहजच कल्पना होते. बहुधा याच कल्पनेवरून रामायणांतल्या वानरराज्यांच्या कथा निघाल्या आहेत. या महाकाव्यांत वानर नेहमीं शेपटीवालेच वर्णिले आहेत. कवीनें कदाचित् बिनशेपटीचे वानर पाहिले नसतील किंवा कथानकाकरतां त्याला शेपटीवालेच विशेष उपयोगी वाटले असतील. वानरांना **मनुष्य-रूप** धारण करतां येत असे असें कवि म्हणतो तेव्हां तो **पुच्छलोप** आणि **वाचाप्राप्ति** याच दोन गोष्टींकडे बोट दाखवीत असतो हें उघड आहे.

रामायणांतील वाली-सुग्रीव वानरकथा स्त्रीच्या अपहाराची आहे. मुख्य मानवकथाहि तशीच आहे. आज वानरांमध्यें जीं **महायुद्धें** होतात तीं **स्त्रियांच्या स्वामित्वासंबंधांचींच** असतात. हीं युद्धें मिटलीं म्हणजे मग सर्व वानर एकमेकांचे सखे होतात. खाद्यासंबंधींहि तंटे होतात पण ते विशेष निकरावर जात नाहींत. ते आपसांत समय करून शेतीभातीवर स्वाऱ्या करतात आणि लूट सामोपचारानें वांटून घेतात. स्त्रियांसंबंधीं मात्र ते केवळ बाहुबलाचाच अधिकार मानतात. त्यांतल्या त्यांत कपींमध्यें एकपत्नीव्रत पाळीत असल्यामुळें तंटे कमी होतात.

---

प्रकरण ११ वें

# पक्षवन्त पशु

ज्याला पशू आणि पक्षी दोन्ही पंक्तींत बसवतां येईल असा एक प्राणी आपणांस माहीत आहे तो वाघुळ हा होय. याला पशूसारखे चार पाय असतात, तोंड असतें, कान असतात, शेपूट असतें, आणि इतकें असून भले मोठाले उड्डाणसमर्थ पंखहि असतात. हे पंख त्याचे चारी पाय आणि शेपूट यांना पुरवणीसारखे असतात. वाघळाला दोन पंखांऐवजीं चार पंख असतात म्हटलें तरी चालेल, इतके व्यापक ते असतात. त्यांना विभागदर्शक घड्याहि असतात. आपण जीं वाघुळें आज भारतांत पाहतों तीं बहुशः फळें खाणारीं आहेत. पण दुसरीं कीटक खाणारीं आहेत. पण दुसरी कीटक खाणारी जातहि आपल्याकडे आहे. इतकेंच काय पण मासे, इतर लहानगे पक्षी आणि बेडूक खाणारीं वाघुळेंहि आपल्या देशांत आहेत. यांचे कान भले मोठे असतात.

वाघुळांत बहुत जाती आहेत. त्यांपैकीं फलभक्षक जातींचीं वाघळें आपणाला बहुधा वडा-पिंपळावर टांगलेलीं आढळतात. या जातीचीं वाघळें विजेच्या तारांत अडकून मेलेलीं कैक वेळां दिसतात. तीं तारांवर टांगण्या-करतां आलेलीं असतात असा सामान्य समज आहे, पण तो खरा नाहीं. या वाघळांना काळोखांत तारा नीट दिसत नाहींत म्हणून तीं अडखळतात हेंच खरें आहे.

कीटकभक्षक वाघळें फलभक्षकांपेक्षा आकारानें लहान असतात. त्यांना आपण पुष्कळ वेळां पाकोळ्या म्हणतों. पण तें योग्य नव्हे. हीं वाघुळें कपाऱ्यांत, गुहांत किंवा निर्जन मंदिरांत राहतात. त्यांना दिवसाचा उजेड सोसत नाहीं. तीं रात्रीं भक्ष्याकरतां हिंडतात. रात्रीं फुलांवर संचार करणारे पतंग किंवा काजवे उडतां उडतां पकडण्यांत हीं वाघळें मोठीं पटाईत असतात.

कीटक पकडल्यानंतर तीं त्यांना सहसा लगेच खाऊन टाकत नाहींत तर आपल्या शेपटाशेजारच्या पंखांच्या कोनाड्यांत सांठवून मग भुकेच्या वेळीं केव्हां केव्हां उडतां उडतां देखील मटकावतात. हीं वाघुळें विजेच्या तारांत अडकलेलीं कधीं आढळत नाहींत. यावरून त्यांचे डोळे विशेष सुग्रहण आहेत असें वाटेल. पण तें खरें नाहीं. त्यांचे डोळे झांकून टाकले तरी देखील तीं सफाईनें तारा वगैरे व्यत्यय टाळून उडूं शकतात. मुसक्या बांधून त्यांचीं तोंडें बंद केलीं तर मात्र त्यांना असें सफाईनें उडतां येत नाहीं. यावरून तीं तोंडानें पाहतात असें कोणी म्हणेल तर तेंहि खरें नाहीं. खरी गोष्ट अशी आहे कीं तीं आपल्या कंठांतून अति उंच सूर काढूं शकतात. ते सूर माणसाला ऐकूं येऊं शकत नाहींत पण त्यांचे त्यांना ऐकूं येतात. तार किंवा दुसरा एखादा पदार्थ पुढें उभा असेल त्यावरून हे ध्वनितरंग परतून त्यांना ऐकूं येतात. उच्चार केल्यापासून प्रतिध्वनि ऐकण्यापर्यंत जो वेळ लागतो त्यावरून ध्वनि परतवणारा आडोसा किती दूर आहे हें त्यांस समजतें असें प्रयोगान्तीं सिद्ध झालेलें आहे. या वाघळांचे कान विशेष मोठे असून त्यांत दोन मोठाले उंचवटे असतात, तसे इतर फलभक्षक वाघळांना नसतात. इतर वाघळांपेक्षां या वाघळांना त्यांच्या कानांची हालचाल अधिक चांगल्या रीतीनें करतां येते. यांपैकीं कांहींना साध्या कानांखेरीज अधिक कान असतात ते नाकावर असतात. कानांची अशी रचना मांसाशनी वाघुळांतहि आढळते.

---

## — भारतीय पशू – सूचि —







आ. ३ ] चौशिंग [ पृ. ७



आ. ४ नीलगाय [ पृ. ७



आ. ५ ] सांबर [ पृ. ९



आ. ६ ] बारशिंग [ पृ. १०



आ. ७ ] चितळ [ पृ. १०



आ. ९, १ ] चमर [ पृ. १४



आ. ९, २ ] गवय [ पृ. १६



आ. १०] साकिन [पृ. १७



आ. ११] सारा [पृ. १८



आ १३]  ताहर  [पृ.१८



आ.१४] उरण [पृ.१८



आ.१५]  मेष  [पृ.१८



आ.१६]  टाकिन  [पृ. १९



आ. १७] सेरो [पृ. १९



आ. १८] गोरल [पृ. १९



आ. १९] गज [पृ. २३



आ. २०] मतंगज ( दशलक्ष वर्षांपूर्वी ) [पृ. २७





आ. २१, १] गज (२ कोट वर्षांपूर्वी), आ. २] गज (३॥ कोट वर्षांपूर्वी) [पृ. २७



आ. २२] रानघोडा [पृ. २८



आ. २३] गेंडा [पृ. २९



आ. २४] तापीर [पृ. ३०



आ. २५] गोंदीर [पृ. ३२



आ. २६] घूषक [पृ. ३२



आ. २७] मूषिक [पृ. ३४



आ. २८] मूष [पृ. ३५



आ. २९] बांबू घूस [पृ. ३५

आ. ३०] बिनपंखी खार [पृ. ३६





आ. ३१,१] पंखवाली खार [पृ. ३६,३७



आ. ३१, २] पंखवाली खार [पृ. ३७



आ. ३२] साळू [पृ. ३७



आ. ३३] ससा [पृ.३८



आ. ३४] शशुंदर [पृ.३९



आ. ३५] मार्मोत [पृ.३९



आ. ३६] चिचुंदर [पृ.४२



आ. ३७] कुपणडुकर [पृ.४४



आ. ३८] पांगोलीन [पृ.४५



आ. ३९] एरमाईन [पृ.४७



आ. ४०] रातेल [पृ.४८



आ. ४१] मार्टेन [पृ.४९



आ. ४२] पाणमांजर — पाणकुत्रें [पृ.५१



आ. ४३] रिंच [पृ. ५५



आ. ४४] भालू [पृ. ५५



आ. ४५] ऋक्ष [पृ.५५



आ. ४६] पंडा [पृ.५६



आ. ४७] कोल्हा [पृ.५७



आ. ४८] लांडगा [पृ.५८



आ. ४९] तरस [पृ. ५९



आ. ५०] मृगया—सांबर आणि श्वान [पृ. ६१





आ. ५१] जंबूक श्वान [पृ. ५७-६०



आ. ५२]                    शबल मांजर                    [पृ.६५



आ. ५३]                    सोनमांजर                    [पृ.६५



आ. ५४] धीवर मांजर [पृ. ६६



आ. ५५] कराकल [पृ. ६७



आ. ५६] मध्यम ऊद [पृ. ६९



आ. ५७] जवादी मांजर [पृ. ७०



आ. ५८] मोठें ऊद [पृ.७०



आ. ५९] सील्‌ [पृ.७०



आ.६०] मुंगूस [पृ.७१




आ. ६१] नकुल महानकुल [पृ. ७२



आ. ६२] केसरी [पृ. ७४



आ. ६३] शूलदंत [पृ. ७७



आ. ६४] सिंहीण, सिंह [पृ. ७८



आ. ६५] पट्टया वाघ [पृ. ७९



आ. ६६] बिबळ्या वाघ [पृ. ८०



आ. ६७] शबला [पृ. ८०



आ. ६८] ढगळा [पृ.८०



आ. ६९] चित्ता [पृ.८१



आ. ७०] कपि उलूप [पृ.८५



आ. ७१] दाक्षिणी माकड [पृ.८५



आ. ७२] उत्तरी माकड [पृ.८६



आ. ७३] आसामी माकड [पृ.८६



आ. ७४] मर्कटसिंह [पृ.८७



आ. ७५] हनुमान [पृ.८७





आ.७७] निलगिरी लांगूर [पृ.८८

आ. ७६] टोपीवाला लांगूर [पृ.८७



आ. ७८] लठ्ठ लोरिस [पृ.८९



आ. ७९] लुकडें लोरिस [पृ.८९



आ. ८०] फलाशनी वाघुळ [पृ. ९४



आ. ८१] कीटकाशनी वाघुळ [पृ. ९५



आ.८२] मांसाशनी वाघुळ [पृ.९५